मनोहर ग्रंथमाला प्रकाशन ४३ वें

# मानसचित्रें

लेखक :
गंगाधर गाडगीळ, एम्. ए.

शके १८६८ ] प्रथमावृत्ति [ आक्टोबर १९४६

किंमत २॥ रुपये

# अनुक्रमणिका







# आशीर्वाद

रा गाडगीळ हे एक होतकरू वाङ्मय-लेखक दिसतात त्याच्या लघुकथाचें हें पुस्तक मीं वाचलें बहुतेक सगळयाच गोष्टी वाचनीय आहेत. व त्यातील काहीं मी पूर्वी मासिक पुस्तकात वाचल्या होत्या त्यापैकीं विशेष शिफारसच करावयाची तर मी खालील गोष्टींची करीन

**बाअी शाळा सोडून जातात**, **प्रिया आणि मांजर**, **स्वप्नरंजन**, व **रिकामी बस**; पण अभिरुचीची एकच कसोटी असत नाहीं. निरनिराळ्या वाचकाना निरनिराळ्या कारणाकरिता निरनिराळयाच लघुकथा आवडतात. रा **गाडगीळ** याची विवेचनपद्धति मुळीच कंटाळवाणी होत नाहीं मात्र प्रत्येक गोष्टीत सारखाच रंग भरतो असें हटकून होत नाहीं हल्लींच्या तरुण मडळीचें वाङ्मयलेखन पाहिलें म्हणजे त्यानीं आपल्या यशाच्या ध्येयाला पंधरा वीस वर्षे मागें ओढलें व हस्तगत केलें असें म्हणता येईल. सर्वच गोष्टींत पुढील पिढी ही मागच्या पिढीला मागें टाकील यात काय नवल ?

न चिं. केळकर,
७-१०-४६

# प्रकाशकाचें पान

माझे मित्र प्रा. गंगाधर गाडगीळ यांच्या लघुकथांचा संग्रह मनोहर ग्रंथमालेंतून प्रसिद्ध करतांना मला आनंदच नव्हे तर अभिमान वाटत आहे. आठ वर्षे संपादन व्यवसाय करतांना डोंगराएवढी रद्दी मला वाचावी लागली आहे आणि अनेक वेळी डोंगर खिडून काटे अगर खड्डे या व्यतिरिक्त कांहींच दृष्टीस पडत नाहीं. पण केव्हा केव्हा अनपेक्षितपणें एखादा गोड पाण्याचा प्रवाह सापडतो किंवा एखादें सुरेख कोरीव लेणेंहि दृष्टीस पडते.

अशाच अनपेक्षित रीतीनें कांहीं चांगले लेखक माझ्या हातीं लागलें. त्यांचें कर्तृत्व साहित्यक्षेत्रांत आतां मान्यता पावलेलें मला दिसत आहे. श्री. गाडगीळ हे अशा लेखकांपैकींच एक आहेत. त्यांची पहिली गोष्ट 'प्रिया आणि मांजर' प्रथम वाङ्मयशोभेंत त्यांच्या विद्यार्थीदशेंतच प्रसिद्ध झाली आणि नंतरहि त्यांनी पुष्कळशा गोष्टी वाङ्मयशोभेंतच लिहिल्या. आरंभी ते विनोदी कथाच लिहित असत. पण नंतर त्यांचें अवलोकन जसजसें वाढत गेलें आणि आकलनशक्ति प्रगल्भ झाली तसतसे विनोदी कथांच्या चक्रांतून ते आपणहून बाहेर पडले. या संग्रहांतहि त्यांच्या विनोदी गोष्टी त्यांनी गाळल्या आहेत. आणि आज ज्या मनोविश्लेषणात्मक कथा ते लिहीत आहेत—साहित्यकोविद त्यांना काय नांव देतील माहीत नाही—त्या प्रकारावर ते सांगून स्थिर झाले. अर्थात् त्यांतहि अवलोकनाची सूक्ष्मता आणि नाविन्य भरपूर आढळेल.

त्यांचें कांहीं लेखन मी पूर्वीं परत केलें व माझ्या दृष्टीनें खाजगी रीतीनें टीकात्मक सूचनाहि केल्या. पण त्याचा गाडगीळांनीं कधीच राग न मानतां वैयक्तिक स्नेह वाढविला. आज अन्य नियतकालिकें त्यांच्या कथा साक्षेपानें मागवीत आहेत व उद्यां अहमहमिकेनें मागवितील. पण तरीहि त्यांनी वाङ्मयशोभेशीं असलेलें स्नेहबंधन कायम ठेवलेलें आहे. यांतच त्यांचें सौजन्य आहे आणि त्याचाच मला आनंद वाटतो.

गाडगीळांची पहिली गोष्ट वाङ्मयशोभेंत आली, पहिलें पुस्तक मनोहर ग्रंथमाला प्रसिद्ध करीत आहे. यापुढें वाढत्या क्षेत्रांत त्यांची लेखणी संचार करील तरी पण ही पहिली स्मृति त्यांनाहि नेहमीच सुखद वाटेल अशी माझी खात्री आहे.

# निवेदन

सर्वसामान्यपणें मराठी वाचकाच्या हातात ज्या लघुकथा पडतात, त्याहून ह्या लघुकथा निराळ्या व वैशिष्ट्यपूर्ण आहेत असा विश्वास वाटल्यामुळेंच मी त्या संग्रहरूपाने वाचकास सादर करीत आहें.

विषयवैचित्र्य व सूक्ष्म मनोचित्रण हीं ह्या संग्रहाचीं ठळक वैशिष्ट्यें आहेत असे म्हणता येईल. आणि मुलाच्या स्वभावावर व मनोव्यापारावर आधारलेल्या ज्या काहीं लघुकथा येथें संग्रहित केलेल्या आहेत त्या वाचकाच्या पसंतीस उतरल्या तर मला विशेष आनंद होईल.

वास्तव जगाच्या माझ्या निरीक्षणातूनच ह्या लघुकथाचा जन्म झाला आहे. त्या निरीक्षणाला ठराविक वाङ्मयीन संकेताच्या मर्यादा नसाव्या असा मी परिश्रमपूर्वक प्रयत्न केला आहे असें असलें तरी रूढ संकेत व अवास्तव प्रसंग ह्यानीं माझी नजर चुकवून, ह्या लघुकथात प्रवेश केला नसेल असें म्हणता येत नाहीं.

लघुकथेच्या तंत्राच्या काहीं ठराविक साच्यात ह्या कथा बहुधा बसणार नाहींत. पण लघुकथा परिणामकारक करण्याकरिता, काहीं तांत्रिक युक्त्या सुचल्या त्याप्रमाणें, मीं योजिल्या आहेत.

कुठल्याहि सामाजिक अगर राजकीय मतप्रणालीचा हेतुपुरःसर पुरस्कार करण्याकरिता ह्या लघुकथा लिहिलल्या नाहींत. जीवनात जे काहीं वैशिष्ट्यपूर्ण ( Significant ) उत्कट अनुभव ( experiences ) मला आले, त्याची पुनर्निर्मिति म्हणजेच निवेदन करणें हेंच ह्या लघुकथाचें कार्य आहे.

ह्या संग्रहातलि लघुकथात काहीं दोष आहेत ह्याची मला जाणीव आहे. ह्या लघुकथा बहुधा कॉलेज जीवनाच्या उत्तरार्धात अगर त्यानंतर लवकरच लिहिल्या गेल्या आणि त्या वयात माणसाच्या मनोवृत्तींत जो पोंचट स्वप्नाळुपणा व जी कृत्रिम भावनाविवशता असते, त्याची झळ ह्या लघुकथाना मधून मधून लागलेली आढळून येईल. त्याचप्रमाणें भाषाशैलींत आणि निवेदन पद्धतींत बोजडपणाचा दोष मधून मधून डोकावतो.

पण रचनेचा आणि परिणामाचा एकसंधीपणा बिघडूं नये, म्हणून हे दोष सुधारण्याचा प्रयत्न मीं केलेला नाहीं.

वरील दोष वाचकानीं गोड करून घ्यावे, अशी विनंति आहे. इतर काहीं दोष कोणास आढळले तर त्यानीं कृपा करून ते माझ्या नजरेस आणावे.

ह्या लघुकथा ह्यापूर्वी निरनिराळ्या मासिकातून प्रसिद्ध झालेल्या आहेत. त्या पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यास ज्या संपादकानीं परवानगी दिली त्याचा मी आभारी आहें. त्याचप्रमाणें ज्या वाचकानी त्यांचें वेळोवेळीं कौतुक केलें, त्याचाहि मीं आभारी आहें.

प्रिय मनोहर अळतेकर ह्यानें सूचनाच्या व टीकेच्या द्वारें मला जी अमूल्य मदत केली आहे तिचा पुरेसा निर्देश कसा करावा तें कळत नाहीं व मला सतत प्रोत्साहन दिल्याबद्दल श्री. मनोहर केळकर ह्याचेहि मनःपूर्वक आभार मानणें अवश्य आहे.

सरतेशेवटीं माझ्या लेखनाचें सतत प्रेमळपणें कौतुक करणाऱ्या माझ्या आईचा प्रेमपूर्वक निर्देश केल्याशिवाय मला हें निवेदन संपविता येत नाहीं.

सुरत.
१६-९-१९४६

गंगाधर गाडगीळ

## मोहन १

कोणीसें येऊन आईला निरोप सांगितला कीं पुण्याच्या मावशीच्या छबीचें लग्न ठरलें आहे.

आतां त्या क्षणाला तरी मोहनला मावशीच्या छबीविषयीं इतकीदेखील कदर वाटत नव्हती.

तो एका पातेल्यांत बसून गरगरा फिरत होता. आणि त्याला वाटत होतें कीं आपण एक फार मोठा नवीन शोध लावला आहे. तांदुळ ठेवण्या-करिता जें पातेलें आजपर्यंत वापरलें गेलें त्याचा असा नाविन्यपूर्ण उपयोग करता येईल ही कल्पना शशीलाच काय पण त्याच्या पुस्तकातल्या ठेंगुजी-लाहि सुचली नसावी.

मोहनला कळेना कीं सारखें काम करणारी आपली आई अशी पाते-ल्यात बसून गरगरा कां फिरत नाहीं. म्हणून तो मोठ्यानें ओरडूं लागला, "आईऽ! पाहा मी कशी गंमत करतोय्."

एरवीं आईनें मोहनच्या ओरड्याकडे दुर्लक्ष केलें असतें. पण आता त्यामुळें निरोप धड ऐकूं येईना. म्हणून रागावून तिनें मोहनचें बकोट धरून त्याला पातेल्याच्याबाहेर काढलें, त्याच्या पाठींत एक धपका मारला, आणि पातेलें जाग्यावर ठेवलें.

अर्थात्‌च मोहन खूप रागावला. त्याला आईचा राग आला; त्या निरोप सांगणाऱ्या माणसाचा राग आला. आणि सर्वांत जास्त राग कोणाचा आला असेल तर तो त्या मावशीच्या छबीचा.

छबी! नांवच किती राग येण्यासारखें होतें पाहा!

मोहन पुटपुटला, " छबिटली, फिबिटली ! " आणि त्या छबीला मारण्याकरिता त्यानें हातवारे केले.

शिवाय असें कीं मोहन जरी गरगरा फिरायचा थांबला होता तरी त्याचें डोकें बेटें अजूनहि फिरत होतें. आणि त्यामुळें त्याला राग येत होता आणि आश्चर्यहि वाटत होतें.

रागावून मोहन खिडकीबाहेर पाहात उभा राहिला होता. राग आला म्हणजे शशीदेखील असाच उभा राहत असे. ताईदेखील !

इतक्यात चपलांचा आवाज आला आणि मोहननें ओळखलें कीं ताई बाहेर चालली होती. आणि मग एका आठवणीनें टुण्दिशी डोक्यात उडी मारली. ताईनें त्याला एक अवघड इंग्रजी वाक्य शिकवून ठेवलें होतें. काय बरें ? हं, ' विश् यू गुड लक्. ' आणि तें ती बाहेर जाताना म्हणायचें होतें.

चक्क विसरला होता कीं तो सगळें हें ! तरी सकाळीं त्यानें तें वाक्य पुष्कळदा घोकलें होतें; आणि आईच्या पैशाच्या पिशवीसारखी त्याच्या डोक्यात पिशवी होती तिच्यात ठेवून दिलें होतें.

आता आठवण झाली म्हणून ठीक ! नाहीं तर केवढा घोटाळा झाला असता !

ताई अर्धा जिना उतरली होती तरी धावत जाऊन त्यानें तें वाक्य म्हटलें.

ताई हंसली, परत फिरली, आणि तिनें त्याचा गालगुच्चा घेतला. मोहनला खूप मौज वाटली. अगदीं कृतकृत्य झाल्यासारखें वाटलें. केवढी मोठी जबाबदारी पार पाडली होती त्यानें !

लाब लाब टागा टाकीत तो घरात आला. तशी आईनें उचलून त्याचा मुका घेतला.

आईच्या मघाचच्या रागावण्याची त्याला आठवण झाली. आणि आपल्या अपमानाची भरपाई करण्याकरिता तो गाल पुसून रागानें म्हणाला, " आम्ही नाहीं जा. आता कशाला ? "

पण आई परत त्याचा मुका घेऊन म्हणाली, " आता आपण पुण्याला जायचें. "

त्या शब्दांनीं मोहनचें सारें कुतूहल आणि सारी उत्सुकता एकदम जागृत झाली. अनेक प्रश्न गंभीर चेहेरे करून त्याच्यापुढें उभे राहिले.

तो मोठ्या जबाबदार स्वरानें आईला म्हणाला, " आई, हें पुणें किती लांब आहे ग ? मामीच्या घराइतकें ? "

" छे, रे. मामीचें घर तर इथें जवळ आहे. "

मोहननें आपल्या कल्पनाशक्तीला खूप ताण दिला, आणि मोठाले डोळे करून तो म्हणाला, " मग ? आत्याबाईच्या घराइतकें ? "

आई म्हणाली, " छे, रे. खूप दूर आहे. आगगाडींतून जावें लागतें तेथें. "

आत्याबाईच्या घराहून एखादें ठिकाण दूर असूं शकेल ही मोहनला कल्पनाच नव्हती. आणि त्यामुळें त्या भयंकर लांबपणाची कल्पना येण्यासाठीं तो खूप डोकें चालवूं लागला.

लांब म्हणजे किती लांब ? गच्चीवरून दिसणाऱ्या डोंगराइतकें कीं अगदीं आकाशाइतकें ? हां, आठवलें ! त्यानें शशीच्या तोंडून असें ऐकलें होतें कीं रामाची शेंडी अगदीं खूप खूप लांब आहे. आणि त्यानें असा कयास बांधला कीं पुणें हें रामाच्या शेंडीइतकेंच लांब असावें.

एवढी मोठी बातमी मिळाल्यावर आईजवळ थांबणें शक्यच नव्हतें. धडपडून तो आईच्या कडेवरून उतरला आणि मुलुखगिरीवर निघाला.

वाटेंत त्याला साऱ्याची कमळी दिसली. शेंबडी आणि भांडखोर ! त्याला ती मुळींच आवडत नसे. पण ही बातमी पोटात राहायलाच तयार नव्हती.

तो म्हणाला, " आम्ही पुण्याला जाणार आहोंत. "

कमळीनें झिपऱ्या सावरीत विचारलें, " केव्हा ? "

गंभीर चेहरा करून मोहन म्हणाला, " परवा. म्हणजे उद्याच्या परवा. " ( कालगणनेच्या बाबतींत अजून मोहनचे फार घोटाळे होत असत. )

प्रसंगाचें गांभीर्य कमळीच्या डोक्यांत शिरल्यासारखें दिसेना. म्हणून मोहन परत म्हणाला, " आमचें पुणें ( पुण्यावर मोहनचा हक्क आता शाबीत झाला होता ) किती लांब आहे ठाऊक आहे का तुला ? अगदीं खूप ! रामाच्या शेंडीइतकें ! तुला काय माहीत आहे ? "

कमळी झिपऱ्या सावरीत भांडखोरपणें म्हणाली, " आम्हाला माहीत

आहे म्हटलें. आम्ही गेलों होतों धुळ्याला. तें तर रामाच्या शेंडीपासून सीतेच्या वेणीइतकें लांब आहे. तुम्हाला काय ठाऊक आहे ! ”

मोहनला धक्काच बसला. रामाची शेंडी ही देखील लांबीची कमाल मर्यादा नव्हती तर !

त्याला कांहीं प्रत्युत्तर सुचेना. पण पुणें हें धुळ्याहून अधिक लांब आहे अशी मात्र त्याची खात्री होती.

तो फार गोंधळला. आणि आपल्याला निरुत्तर करणाऱ्या कमळीचा त्याला खूप राग आला. तिच्या वादकौशल्याचें कौतुक करण्याची खेळाडू वृत्ति अजून त्याच्या मनात निर्माण व्हायची होती. त्याचें नाक फुगलें, ओंठ पुढें आले. आणि तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, “ नाहींच मुळीं. आमचें पुणेंच लांब आहे. ” आणि वादविवादातील आपल्या जयावर अखेरचा शिक्का मारण्याकरिता तो मोठयानें ओरडला, “ हो, हो, हो. ”

पण कमळी तेवढयात काहींतरी दुष्टपणानें बोललीच. त्यामुळें मोहन अधिकच रागावला. शेवटीं त्या दोघांची मारामारी झाली. मोहननें कमळीच्या झिपऱ्या ओढल्या. कमळीनें त्याच्या तोंडाला बोचकारलें.

अखेर दोघें रडत घरात गेलीं. आणि त्याच्या भावनाना झालेल्या विलक्षण दुखापतीवर खाऊची विलक्षण गुणकारी मलमपट्टी करावी लागली.

* * *

संध्याकाळीं मोहन फार महत्त्वाच्या कामात गुंतला होता. ताईच्या खणातून त्यानें तिची चकचकीत कंपासपेटी काढून घेतली होती. आणि शशीच्या मोठ्या वहीवर तो चित्रें काढीत होता.

ताई शेपटा घालून बाहेर जात आहे असें चित्र त्यानें काढलें होतें. चित्र कसें छान आलें होतें. ताईचें डोकें कसें आवळ्यासारखें आलें होतें. नाकाच्या ठिकाणीं एक सुरेखसा उंचवटा काढायला तो मुळींच विसरला नव्हता. शेपटा चांगला पाठीला चिकटला होता. आणि तिनें हातात बिस्किटासारखी दिसणारी पर्स घेतली होती.

मोहन स्वतःच्या चित्रकलेवर बेहद्द खूष झाला होता. इतका कीं ‘ बाई कोणी साजा केला ’ ( बाई तिन्हीसाजा झाल्या ) हें लोकप्रिय गीत तो

गुणगुणत होता आणि कोणीतरी आपल्या चित्रकलेचें कौतुक करावें असें त्याला वाटत होतें.

इतक्यात दादा तेथें येऊन म्हणाला, "काय चाललें आहे, मोहनराज ?"

महत्त्वपूर्ण स्वरात मोहन म्हणाला, "मी चित्र काढतों आहें."

दादाने त्याचें चित्र निरखून पाहिलें. पण नीटशी काहीं कल्पना येईना. म्हणून त्यानें विचारलें, "कसलें रे ?"

मोहन चित्रातल्या ताईला एक भला मोठा कान चिकटवून म्हणाला, 'ताईचें.'

दादा हंसून म्हणाला, "ताई होय ही ! झोपली आहे वाटतें !"

मोहनला दादाच्या अज्ञानाचें हंसूं आलें. तो म्हणाला, "नाहीं. ती उभी आहे."

दादा म्हणाला, "अरे चल, ती झोपली आहे. तुला काहीं कळत नाहीं."

मोहननें विलक्षण आश्चर्यानें दादाकडे पाहिलें. म्हणे मोहनला कळत नव्हतें ! अशी कोणती महत्त्वाची माहिती होती कीं ती मोहनला ठाऊक नव्हती ? टेलिफोनमध्यें बोलताना 'हलाव् हलाव्' करावें लागतें हें त्याला माहीत होतें, घड्याळात अडीच वाजतात हें माहीत होतें, आत्याबाईच्याकडे ट्राममधून जाताना तिकीटवाल्याला काय सांगावें लागतें तें माहीत होतें, कावळ्याचें घर शेणाचें होतें हें तर तो शशीच्या पुस्तकातून वाचत असे; आणि कानात एक खिडकीला लावतात तसला पडदा असतो ही महत्त्वपूर्ण माहिती देखील शशी पुस्तक वाचत असताना त्यानें ऐकली होती.

पण हें सारें दादाला कसें सांगावें तें त्याला कळेना. आणि दादा तर सारखा म्हणत होता कीं "मोहनला काहीं कळत नाहीं."

शेवटीं तो रागावून म्हणाला, "अशानें मी तुला पुण्याला नेणार नाहीं बरें का."

ह्या धमकीनें मात्र दादा घाबरला.

......इतक्यांत शशी कुठुनसा ओरडत आला. त्यानें मोहनच्या हातातील वही आणि पेटी हिसकून घेतली, आणि मोहनचा भला मोठा गालगुच्चा घेतला. मोहनला आणखीहि खूप प्रसाद मिळाला असता. पण दादानें त्याचा बचाव केला.

मोहन फार रागावला. शशीनें तेवढीं चित्रें काढायची, वहींत लिहायचें,

क्रिकेट खेळायला जायचें, फार काय शिरापुरी घेऊन ट्रिपला जायचें. आणि मोहननें मात्र काऽऽहीं करायचें नाहीं. वाण्याकडून वड्यादेखील आणायच्या नाहींत.

त्याला विलक्षण खिन्नता वाटली. आपल्या आवडत्या लाकडी घोड्यालादेखील त्यानें खुशाल फेकून दिलें.

बाहेर येऊन तो आईला चिकटून उभा राहिला. आईचें आणि बाबाचें गंभीर संभाषण चाललें होतें. पुण्याला जाण्याकरिता तिकिटें काढायचीं होतीं. आणि हल्लीं तिकिटें मिळणें फार कठीण होतें.

मोहनचें लक्ष ताबडतोब त्या बोलण्याकडे वेधलें. त्यालाहि पुण्याला जायचें होतें ना! त्याचें तिकीट काढायला आई विसरली असती म्हणजे मोठाच घोटाळा झाला असता. आणि ह्या मोठ्या माणसावर विश्वास टाकायची मुळींच सोय नव्हती. लहान मुलाचीं कामें तीं हटकून विसरतात. बाबानीं अजून त्याला सायकल कुठें आणली होती?

म्हणून हलक्या स्वरात त्यानें आईला आठवण केली, "माझें पण तिकिट काढ हं."

तशी बाबानीं त्याच्याकडे पाहिलें, आणि हंसून ते म्हणाले, "छट् तुझें काढायचें अर्धें तिकीट"

मोहन एकदम खवळला. चित्रें काढायला द्यायचीं नाहींत तीं नाहींतच आणि परत तिकीटदेखील अर्धेंच काढायचें म्हणजे मोठा जुलूम होता.

तो रागारागानें म्हणाला, "मला का म्हणून अर्धें तिकीट? तुम्हालाच अर्धें तिकीट. हलकट, पाजी, बेशरम......" तो पुष्कळ शिव्या शिकला होता.

बाबा रागावून म्हणाले, "हा, शिव्या नाहीं द्यायच्या." आणि त्यानीं मोहनच्या पाठींत एक चापटी मारली.

तशी मोहन अधिकच खवळला, आणि हात उगारून बाबाना मारायला धावला.

तितक्यात दादानें त्याला आवरलें आणि उचलून बाहेर नेलें म्हणून, नाहींतर मोहननें त्या दिवशीं बाबाना चांगलाच चोप दिला असता.

* * *

मोहन पुण्याला जायची तयारी करीत होता. आपले सगळे कपडे त्यानें गोळा केले. चेंडू घेतला, मोडकी कात्री घेतली, फुटक्या फुग्याचा रबर घेतला आणि अशा इतर अनेक मौल्यवान् वस्तू घेतल्या.

आता ह्या सार्‍या वस्तू काढताना कपाटातले सगळे कपडे उसकटले गेले आणि एक बॉक्स् खालीं पडली तर त्यात त्याचा दोष काय होता बरें ?

मोहनच्या सार्‍या वस्तू त्याच्या छोटया बॅगेंत खेळीमेळीनें बसण्यास तयार नव्हत्या. आणि त्याना तसें बसविण्याच्या प्रयत्नात तो चागलाच घामाघूम झाला होता.

इतक्यात दादा घाईघाईनें घरीं आला आणि म्हणाला, "आई हीं बघ तिकिटें आणलीं आहेत. तुझ्या चहाच्या डब्यावर ठेवलीं आहेत हं."
आणि तसाच घाईनें तो निघून गेला.

मोहननें तीं तिकिटें पाहिलीं. आणि त्याच्याविषयीं त्याला फारच काळजी वाटूं लागली.

तीं तिकिटें साडायची किती शक्यता होती बरें ! कपाटामागें फिरणार्‍या उंदराला तीं पळवून न्यायला कितीसा वेळ लागला असता ? आणि छता-जवळ घरटें बाधणार्‍या त्या लबाड चिमण्या ! वाटेल ती वस्तु त्या उचलून नेत असत. मोहनच्या पतंगाचा धागा नव्हता का त्यानीं असाच लांबवला ?

आणि त्याच्याकडचा रामा चोर आहे असें आई परवाच म्हणाली होती तें मोहनला चागलेंच आठवत होतें. मोहननें धास्तीच घेतली होती त्या रामाची. आणि लाब शेंडी असलेले सगळेच चोर असावेत असा त्यानें कयास बाधला होता.

विलक्षण धास्तावलेल्या नजरेनें मोहन त्या तिकिटाच्याकडे पाहूं लागला. आणि तितक्यात जेव्हा उंदराची खुडबुड त्यानें जवळच ऐकली तेव्हां त्याच्या मनानें एक ठाम निश्चय केला.

त्यानें खुर्ची ओढत आणली, आणि खुर्चीवर चढून त्यानें तीं तिकीटें काढून घेतलीं. त्याला फार आवडलीं तीं. तावडीं, चपटीं, छोटींशीं. तीं घेऊन थोडा वेळ खेळावें असें देखील त्याला वाटलें. पण त्यानें आपलें मन आवरलें, आणि तीं सुरक्षितपणें आपल्या खिशात ठेवून दिलीं.

ह्याहून शहाणपणानें आणि जबाबदारीनें वागणें शक्य होतें काय ?

ह्यानंतर अर्थात् व्हायचें तेंच झालें. मोहन ती गोष्ट पूर्णपणें विसरून गेला. इकडे आईनें मात्र तीं शोध शोध शोधलीं आणि रडकुंडीला आली बिचारी !

शेवटीं दुपारीं मोहननें मोरींत खेळताना कपडे भिजवले ते बदलत असताना तीं तिच्या हाताला लागलीं. अर्थात् त्याबरोबर ती खूप उखडली आणि नसते उपद्व्याप केल्याबद्दल तिनें मोहनला चागलेंच बदडलें.

मोहन बिचारा ओक्साबोक्शी रडूं लागला. आपलें काय चुकलें तें त्याला कळेना.

लहान मुलाच्यावर जे अनेक अन्याय घडतात त्यातलाच आणखी एक घडला होता.

* * *

दुसऱ्या दिवशींची सकाळ म्हणजे महत्त्वपूर्ण घटनाचें एक गाठोडेंच होतें. आणि मोहनदेखील फार जबाबदारीनें वागत होता.

त्या दिवशीं त्यानें दुधाऐवजीं चहा हवा म्हणून आईशीं मुळींच हट्ट धरला नाहीं आणि स्वतःला आंघोळ घालायची आईला परवानगी देण्याचें फार मोठें औदार्य दाखवूनच तो थाबला नाहीं तर त्यानें आपल्या डोक्याला साबणदेखील लावून घेतला.

पण माणसाच्या औदार्याला देखील काहीं मर्यादा असते.

पुण्याला जाताना लेंगा, नेहरू शर्ट आणि गांधी टोपी असा पोषाख करावा असा मोहनचा बेत होता. आणि आईला तो मुळींच पसंत नव्हता. आईची विचारसरणी अशी होती कीं मोहनच्या नेहरू शर्टवर आंबरसाचे बरेच डाग पडले होते. लेंगा घालून चालत असता त्यात पाय अडकून पडण्याची त्याची संवय अजून मोडली नव्हती. आणि मोहनची गांधी टोपी त्याच्या डोक्यावरून कधीं खालीं सरकेल आणि त्याचे नाकडोळे कधीं अदृश्य होतील ह्याचा भरंवसा नव्हता. अशा परिस्थितींत मोहननें ते कपडे घालणें तिला अनिष्ट वाटत होतें.

अर्थात् ह्यातला एकहि मुद्दा मोहनला पटत नव्हता. शर्टवर आंब्याचे थोडेसे डाग पडल्यामुळें तो खराब होतो ही कल्पनाच मुळीं त्याच्या दृष्टीनें चुकीची होती. तो शर्ट नवा होता, आणि तो नवा राहावा म्हणून त्यानें

आतापर्यंत तो धुवायला टाकायचें नाकारलें होतें. लेंगा घातल्यामुळें दादाचा मोठेपणा आणि रुबाब आपल्यात बऱ्याच प्रमाणात उतरतात अशी त्याची प्रमाणिक समजूत होती आणि गांधी टोपीबद्दल म्हणाल तर ती डोक्यावर तिरपी बसवल्यावर आपल्या आवडत्या वर्तमानपत्रवाल्या पोऱ्याची ऐट आपल्या अंगात येते हें त्याला कधींच कळून चुकलें होतें.

आता ती टोपी मधूनमधून त्याच्या डोळयावर सरकत असे ही गोष्ट खरी होती. पण चालता चालता एका हातानें ती सारखी वर करणें हें मोहनला मुळींच त्रासदायक वाटत नसे.

ह्या मतभेदाला अर्थातच फार गंभीर स्वरूप प्राप्त झालें. आई खूप रागावली आणि तिनें त्याला मारलें देखील. पण दुसरे कपडे अंगावर घालून घेण्यास तो बिलकूल तयार नव्हता.

आई पुटपुटत होती, "छळवादी मेला! कध्धीं कुठे नीटपणें जाऊं द्यायचा नाहीं."

मोहन आपला रडत होता. विलक्षण कोंडमारा झाल्यासारखें त्याला वाटत होतें. खरोखर त्याला मोठें व्हायचें होतें. म्हणजे अशी त्याची असहाय परिस्थिति झाली नसती. मग त्यानें बाबांच्यासारखे खिशातून पैसे काढून खूप खूप, सगळे खिसे भरून, खाऊ घेतला असता, समोरच्या गुजराथ्यासारखे त्याने खूप केस वाढवले असते, आणि त्याचीं टोकें त्याच्या एका डोळयात गेलीं असतीं, त्यानें मोठ्या घड्याळाला किल्ली दिली असती; आणि सान्याच्या कमळीला तर त्यानें चांगलेंच बदडून काढल असतें.

पण तो कधींकाळीं मोठा होणार होता कोण जाणे!

इतक्यांत दादा आला, व त्यानें मोहनला सबंध खडू देऊं केला. पण जेव्हा त्यानें आपलें पेन मोहनला खिशात अडकवायला द्यायचें कबूल केलें तेव्हा मात्र मोहनराजाची कळी एकदम खुलली आणि हंसतमुखानें त्यानें आपले कपडे चढवले.

* * *

घरातून बाहेर पडताना मोहनला जोशांच्या मधूची आणि चाफेकरांच्या दामूची फार कींव आली. पुण्याला जाण्यासारखी महत्त्वाची घटना त्यांच्या आयुष्यांत घडूं नये ह्याचें त्याला फार वाईट वाटलें.

म्हणून त्यानें त्याना पुण्याला न्यायचें कबूल केलें. पण ही गोष्ट जेव्हा मोहननें आईजवळ काढली तेव्हा ती एकदम त्याच्यावर खेकसली आणि तो साराच रम्य बेत ढासळला. मोहन आणि त्याचे मित्र बिचारे हिरमुसले झाले.

स्टेशनवर आल्यावर मोहन विलक्षण घाबरून गेला. इतका कीं दादाला आपला हात पकडायची त्यानें पूर्ण परवानगी दिली—नव्हे त्यानेंच दादाचा हात घट्ट धरून ठेवला होता.

स्टेशन म्हणजे एक प्रचंड आणि गुंतागुंतीची गोष्ट होती. आणि इतका गोंगाट चालला होता तेथें! मोहनला आश्चर्य वाटत होतें कीं बाबा रागावतील अशी ह्या लोकांना भीति कशी वाटत नाहीं? आणि मध्येंच एक मोठी शिटी ऐकूं आली तशी मुळीं तो रडायलाच लागला.

इतक्यात एक प्रेमळ वृत्तीचा मुसलमान मोहनजवळ आला, आणि त्याला एक खाऊची पिशवी देऊं लागला. मोहननें आनंदानें हात पुढें केला. अजून त्या मुसलमानाइतका सज्जन मनुष्य त्याला भेटला नव्हता.

पण आईनें मोहनचा हात खस्दिशीं मागें ओढला, आणि त्या मुसलमानाला ती म्हणाली, "कांहीं नको आहे आम्हाला."

मोहनला आईच्या दुष्टपणाचा काहीं अर्थच कळेना. तो फुरंगटून गेला, व त्या पुड्याकडे सारखा आशाळभूतपणे पाहात राहिला. आणि ह्या मोठ्या माणसाना खायला आवडत कसें नाहीं ह्याचें त्याला फार आश्चर्य वाटत होतें.

तितक्यांत एका लालकपडेवाल्या माणसानें त्याचें सामान उचललें. आणि तो झपाझप पळून गेला. मोहनची बॅग देखील होती त्याच्याजवळ. तें पाहून मोहन चांगलाच घाबरला. तो त्या माणसाला म्हणणार होता, "अरे, अरे, हें काय?" पण तो गप्पच राहिला. त्याला आश्चर्य वाटलें कीं आई त्या माणसाला काहींच कसें बोलली नाहीं.

हंऽऽ, सामान गेलेंच होतें आता चोरीला पण त्याबद्दल तो मुळींच जबाबदार नव्हता. आणि आई त्याला रागावली असती तर त्यानें सांगितलें असतें, "मग मीं तिकीटें नीट ठेवलीं तेव्हा तूं का रागावलीस?"

थोड्या वेळानें एक चकचकीत यंत्र हातात घेऊन कट्कट् करणाऱ्या साहेबानें त्याचीं तिकिटें तपासलीं आणि त्यांना आत सोडलें.

नशीब कीं त्यानें त्याना ' चले जाव' म्हणून सांगितलें नाहीं.

मोहनला एकंदरींत तो 'कट्कट्' करणारा साहेब फार आवडला. तिरपी टोपी घालून सायकलवरून ऐटींत फिरणाऱ्या वर्तमानपत्रवाल्या पोऱ्यापेक्षांहि अधिक आवडला. म्हणून तो परत परत मान फिरवून त्या साहेबाकडे पाहात राहिला. आणि त्यामुळें दादा त्याच्यावर खेकसला देखील.

थोड्या वेळानें गाडी स्टेशनात आली. आणि मग गर्दीच्या लोंढ्याबरोबर दादा त्याला खाद्यावर घेऊन गाडींत कसा चढला आणि एका लठ्ठ माणसाशीं कसा भांडायला लागला तें त्याला समजलेंच नाहीं.

त्या लठ्ठ माणसाचें ओरडणें ऐकून तो पुरता घाबरून गेला. त्याला वाटलें कीं तो आता दादाला मारणार, आणि म्हणून तो दादाच्या शर्टचें टोंक धरून रडायला लागला.

शेवटीं एकदाचें भांडण संपलें. आणि डोक्यावरची एक मोठी जबाबदारी उतरल्यासारखें मोहनला वाटलें.

मग मोहननें इकडेतिकडे पाहिलें तों त्याचें सगळें सामान आपलें गाडींत होतें ! त्याची बॅगदेखील ! आणि तो लालकपडेवाला माणूस त्याच्यासमोर उभा होता. मोहनला खुदकन् हंसूं आलें. त्याला कळेना कीं हा नाहींसा झाला होता कुठें आणि आला कसा ? आणि त्यानें असा कयास बांधला कीं शशीच्या गोष्टींतल्या जादुगारासारखा हा मनुष्य असावा.

बराच वेळ झाला तरी गाडी सुरू होईना, आणि मोहनला अशी भीति वाटायला लागली कीं गाडी चालवणारा साहेब आज गाडी चालवायला विसरला कीं काय ? म्हणजे चांगलाच घोटाळा होणार होता कीं ! पुणें राह्यलें बाजूलाच, पण घरीं गेल्यावर साऱ्यांच्या कमळीनें त्याला खूप चिडवलें असतें मात्र.

पण गाडी सुरू झाली बुवा एकदाची. स्टेशनवर राहिलेल्या सर्व माणसांची मोहनला फार कींव वाटली

मग घरें, खांब, झाडें, भराभर धांवायला लागलीं. वारा वायला लागला. आणि मोहनला इतकी गंमत वाटली कीं तो ताईनें शिकविलेली कविता खूप मोठ्यानें म्हणूं लागला.

ह्या कविता म्हणण्याचा एक अनपेक्षित परिणाम झाला. एक लठ्ठ गुजराथी त्याच्याकडे पाहून हंसला, आणि मोहनला त्यानें एक बिस्किट दिलें.

मोहन फारच खूष झाला. इंग्रजी कविता म्हटल्यामुळें असा फायदा होतो आणि लठ्ठ गुजराथी माणसें इतकीं चांगलीं असतात हें त्याला मुळींच माहीत नव्हतें.

आता तो परत ती कविता म्हणायला लागला. पण तो लठ्ठ गुजराथी हंसेना अगर त्याला बिस्किटहि देईना. तशी मोहनला त्याचा राग येऊं लागला. त्यानें तोंडापुढें धरलेल्या वर्तमानपत्राचा तर त्याला खूपच राग आला.

मग त्याला झोंप यायला लागली. आणि त्याला स्वप्न पडलें कीं सान्याच्या कमळीसारख्या दिसणाऱ्या छबीचें आणि कट्‌कट्‌ करणाऱ्या साहेबाचें लग्न लागतें आहे. त्या दोघांच्यामध्यें मोहननें आणि शशीनें एक मोठें बिस्किट धरलें आहे, आणि ते दोघे मोठमोठ्यानें इंग्रजी कविता म्हणत आहेत......

—अभिरुचि, मे १९४६

# गणूचें लग्न

# २

संध्याकाळ झाली तशी गणूची दाबून ठेवलेली अधीरता अनावर झाली. आपल्यापुढें अजून किती तरी काम आहे ह्या कल्पनेनें त्यानें त्रासिकपणें चाळवाचाळव केली, आणि मग मनात काहीं तरी निश्चय करून तो घाई-घाईनें काम उरकूं लागला. दिवाणखान्यातील सर्व जिनसावर त्यानें जोरजोरानें फडका मारला. जणूं काहीं 'तुमच्यामुळें माझा किती खोळंबा होतो पहा बरे!' असें तो त्या जिनसाना खडसावून विचारीत होता.

मग छोट्या मृदुलाचा पसरलेला खेळ तो त्रासिकपणें भरूं लागला. सगळ्या प्रकारचीं भांडींकुंडीं दारू प्यालेल्या माणसाप्रमाणें अस्ताव्यस्त पडलीं होतीं आणि त्या पसाऱ्यात नव-विवाहित बाहुलाबाहुली मानेवर मान टाकून पडली होती.

गणू एकदम थबकला, व त्या दृश्याकडे कुतूहलानें पाहूं लागला. आणि मग त्याच्या तोंडावर त्याचें नेहमींचें क्षीण हास्य चमकलें. बिलकुल आवाज न करतां गणू निर्जीवपणें हंसूं लागला म्हणजे वाटे कीं प्रमुदित होण्याची त्याच्या मनाची शक्ति जणूं नष्ट झाली आहे आणि हंसण्याची यांत्रिक क्रियाच तेवढी त्याच्याजवळ शिल्लक राहिली आहे.

गणू भानावर आला तो रघू ड्रायव्हरनें त्याच्या पाठींत मारलेल्या जबरदस्त थापेनें! आणि त्या बाहुलाबाहुलीकडे पाहून रघू असा काहीं अंग घुसळून हंसूं लागला कीं, त्याची उंच फरची टोपी आता खालीं पडून मिळणार अशी गणूला नेहमींप्रमाणें भीति वाटूं लागली. पण नेहमींप्रमाणें ती या वेळीं देखील पडली नाहीं. आणि आपल्या मोठ्या आवाजांत रघू म्हणाला, "अरे यार, तुझ्या कारभारणीनें तुला एकदम पागल

केलेलें दिसतेंय्, संभाळ हं. अरे नवऱ्याना असें पागल करून त्याच्या डोक्यावर चढून बसायचें असा या बायकाचा कावाच असतो." आपण एखाद्या गुप्त बॉंबकटाचा शोध लावला आहे असा आविर्भाव रघूच्या चेहऱ्यावर दिसत होता. गणू लाजत म्हणाला, "तसें नव्हे रे. पण आजच माझ्या मामानें तिला मुंबईला आणली. आता ती माझ्या खोलीवर आहे. आणि गंमत म्हणजे मामा आज परत मुलुखाला गेला." एकटया बायकोच्या सहवासात राहण्याच्या कल्पनेनें गणू दचकला.

रघू परत गदगदून हंसणार होता. पण गणूनें एकदम त्याला विचारलें, "अरे, पण लगीन, लगीन म्हणजे आहे तरी काय ही भानगड ?"

आणि सर्व विषयावर तावडतोब मतें देणारा रघू गडबडला. "अरे, लग्न म्हणजे लग्न—आपलें लग्न रे! एवढें नाहीं समजत तुला ?" हातवारे करून लग्न ह्या वस्तूची रूपरेषा आखण्याचा प्रयत्न करीत तो म्हणाला.

रघूच्या डोक्यात ज्ञानानें भरलेली प्रचंड टाकी आहे अशी गणूची कल्पना होती. आणि म्हणून रघूनें आखलेल्या त्या रूपरेषेचा अर्थ काय ह्याचा तो विचार करूं लागला. पण गणूला त्या विचित्र वस्तूची नीटशी कल्पना येईना. लाजणारी आणि भिणारी एक चिमुरडी छोकरी घरात येणें एवढाच लग्नाचा अर्थ कीं काय ? आणि ही बायको घरात आली म्हणजे होतें तरी काय ?

त्याची मालकीण शेटजींना पुष्कळ वेळा पान करून देत असे, आणि कधीं कधीं त्याचे पाय देखील चेपीत असे. आणि हलक्या आवाजात तीं परस्पराशीं बोलत असत तरी किती वेळ! सारंच विचित्र! आपल्या बायकोशीं इतका वेळ अशा तऱ्हेनें बोलणें त्याला जमलें असतें काय ? छे, छे! पण तसें पान खायला त्याला मजा वाटली असती आणि काम करून करून थकलेले त्याचे पाय कोणी चेपले असते तर त्याला खूपच आराम वाटला असता. आणि परवां रघू ड्रायव्हरनें आपल्या बायकोला कशी पण छडीनें फोडून काढली होती आणि तो शिव्या तरी किती ऐटबाज देत होता. गणूनें अजून कोणाला शिव्याच दिल्या नव्हत्या आणि रघू ड्रायव्हरासारखें ऐटींत भाकरी आणायला तरी त्यानें कोणाला फर्माविलें होतें ! बायको म्हणजे एकंदरींत आपलें काम करायला एक माणूसच म्हणाना !

आणि रखमा मोलकरणीच्या गालाला परवा शेटजींच्या उर्मट चिरंजिवानीं हात लावला होता त्याचें काय ? हो—हो, तें त्याला माहीत होतें. कसली तरी विचित्र घाणेरडी इच्छा असते ती. तंबाखू नाहीं खाल्ली म्हणजे कसा जीव बेचैन होतो, तसेंच होतें काहीं तरी—आणि त्याचा म्हातारा मामा—आठ मुलें होतीं त्याला आणि त्याची म्हातारी. आणि घरात काय करायचें, कसें करायचें, हें कसें तो मोठया पेटींत ठरवीत असे. आणि सगळ्याची काळजी तो किती करीत असे. म्हातारा कावला म्हणजे घरातली सगळीं माणसें कशीं अगदीं दबकून असत. 'गादीवर बसून हुकूम सोडणारा शेटजीच असतो नवरा म्हणजे !' क्षणभर शेटजींसारखें बसून समोरच्या भिंतीला दरडावण्याचा मोह गणूला अनावर झाला.

"गणू, अरे गण्या ! मेल्या कान फुटले का रे तुझे ?" बाईसाहेबांच्या ह्या सुरेल हाकेनें गणू भानावर आला, आणि घाईघाईनें बाईसाहेबांच्या पुढें जाऊन उभा राहिला.

"काय, करतो आहेस तरी काय इतका वेळ ? दोन तास झाले भांडीं टाकून. अजून नाहीं का वेळ झाला घासायला तुला ?" बाईसाहेबानीं आपल्या रागाला वाव दिला.

"नाहीं, बाई विसरलों." असें काहींसें पुटपुटून त्यानें सुस्कारा सोडला. आणि हे काहीं नवीन नव्हतें त्याला. कारण असो नसो, धन्यानें आपल्याला ओरडायचें आणि आपण तें ऐकून घ्यायचें ह्याची संवय झाली होती त्याला. आणि कधीं कधीं त्याला वाटे कीं काम करण्याबद्दल नोकराला जसा पगार मिळतो, तसा रागावून घेण्याबद्दलही मिळतो. आणि श्रीमंत माणसें लठ्ठ असतात ह्याचें कारण त्यांच्या रागाला असा भरपूर वाव मिळतो हेंच असतें असें परवाच त्याला खोकल्यानें जर्जर झालेल्या पाडूनें सांगितलें नव्हतें काय ? मोठा गमत्या आहे तो पाडू !

गणूनें मातीचें भांडें फरकन् ओढलें, आणि अगदीं मन लावून भांडीं घासायला सुरुवात केली. मन लावून भांडीं घासलीं कीं, विचाराना भरपूर चालना मिळते अशी त्याची समजूत होती. विचार करायची ज्या माणसाना संवय नसते त्याना बौद्धिक क्रिया आणि शारीरिक क्रिया यातील भेदच कळत नाहीं. आणि गणूला कुठें विचार करायची संवय होती ? सांगतील

तें काम करायचें, बोलतील तें ऐकून घ्यायचें, खायला कांहीं छान मिळालें तर मोठीच मौज, नाहीं तर आहेच नेहमींचें शिळेंपाकें अन्न ! आणि वेळ मिळाला तर लवंडायचें, नाहीं तर चार गप्पा मारायच्या. गप्पाचा विषय काय ? तर गावची हकीगत, नाहीं तर घरातली एखादी गंमत.

छोटा धनी आपल्याला आपला फाटका गंजिफ्रॉक देईल कीं नाहीं किंवा भाजीला दिलेल्या पैशातला एखादा पैसा तंबाखूला उरेल कीं नाहीं, हेच त्याच्यापुढचे महत्त्वाचे प्रश्न असत, आणि आता त्याच्यापुढें केवढा तरी मोठा बिकट प्रश्न पडला होता. एखाद्या लहान मुलाच्या हातात घड्याळ सापडल्यावर त्याची जशी स्थिति होते, तशी गणूची स्थिति झाली होती.

गणूच्या डोक्यात परत विचाराचे वेडेवाकडे झोत सुरू झाले. मनुष्य आयुष्याच्या एखाद्या मोठ्या वळणावर आला कीं त्याच्या मनापुढें आपल्या पूर्वायुष्याचें चित्र उभें रहातें. गणूचेंहि तसेंच झाले. आणि त्याबरोबर त्याला कांहीं तरी, कोठें तरी दुखावल्यासारखें वाटलें. आठवणी मनाला नेहमींच खिन्न करतात. पण गणूला दुखऱ्या जागेला धक्का लागल्यासारखें वाटलें. रखमा मोलकरीण जशी छोट्या मृदुलाच्या डोक्यावर भराभरा पाण्याचे तांबे ओतून तिला घुसमटून टाकते तसें आपल्याला कोणी तरी केलें आहे अशी विचित्र कल्पना त्याच्या मनात चमकून गेली.

* * *

शेटजी गावचा खंड वसूल करायला आले होते. पाटलाच्या ओटीवर बसून शेटजी हिशेब करीत होते. सारे खंडकरी आदबीनें पडवींत उभे राहिले होते. आणि त्या सर्वांकडे कुतूहलानें पहात गणू दारातच थबकून उभा होता.

हिशेब पुरा झाला. शेटजींनीं आपली जाड चोपडी काळजीपूर्वक मिटवली. आणि आपल्या चष्म्याच्या वरून पाटलाकडे पहात ते म्हणाले, "काय पाटील, छोकरा मिळेल का इथें एखादा ? आमच्या मुंबईला अलीकडे नोकरच मिळत नाहीं."

पाटलांनीं जरा विचार केल्यासारखी मुद्रा करीत चिलमीचा एक झुरका मारला आणि खोकल्याची उबळ दाबीत ते म्हणाले, "घेऊन जावा ह्या गणूला. कामसू हाये पोर."

गणू एकदम दचकला. पोरका झाल्यापासून तो आपल्या मामाकडे रहात होता, आणि सकाळपासून संध्याकाळपर्यंत काम करून आणि मामीच्या शिव्या व मार खाऊन आपलें पोट भरीत होता. ‘ आपण मममईला जायचें ’ ह्या कल्पनेनें त्याला आश्चर्य, आल्हाद आणि भीति वाटली आणि तो दाराला अधिकच बिलगून उभा राहिला.

“ पण लेकाचा चोरीबिरी तर करायचा नाहीं ना ? ” शेटजींनीं भीति व्यक्त केली.

“ न्हाई, न्हाई साहेब ! काइ झालं तरी घरंदाजाचं प्वार हाये त्ये. लखू पाटलाचा पोरगा न्हवं का हा ? पण लख्या त्या भैनीच्या मागं लागुनशान् येडा झाला, अन् दारू पिऊन म्येला. म्हून ह्या पोराची ही दशा ! ”

पाटीलबुवाना आपला अभिजात गोष्टी–वेल्हाळपणा आवरता आला नाहीं. पण शेटजींनीं एखादें कोळिष्टक झाडून टाकावें तसें त्याचें बोलणें झाडून टाकलें, आणि लगबगीनें उठून ते म्हणाले, “ बरं, बरं, चल तर. ” आणि गणूच्या डोकीवर भली मोठी ट्रंक देऊन ते छत्री उघडून चालूं लागले.

भर दुपारची वेळ. आकाशातून नुसती तप्त लोहरसाची वृष्टि होत होती. पायाना चटके बसत होते. डोक्यावरच्या त्या जड वजनानें मान ठणकत होती. पाय लटपटत होते. घशाला कोरड पडली होती आणि तोंडावरून घामाचे केवढे तरी ओघळ वहात होते. इतक्यात शेटजी मागें वळून खेंकसले, “ पाय मोडले कीं काय ? चल भरभर ! ”

आणि तेव्हा गणूला वाटलें कीं ती जड ट्रंक शेटजींच्या डोक्यावर चढवावी, आणि डोक्यावर छत्री घेऊन मोठ्या ऐटीनें चालत त्याना असें गुरकवावें कीं– डोक्यावरचें ओझें सावरीत गणू लटपटत्या पायांनीं शेटजींच्या मागून चालला होता.

* * *

रस्त्यातून येताना एक तांबडा भोंवरा मिळाल्यामुळें गणू मोठ्या खुशींत होता. घरीं येताच मोटारीच्या तबेल्याच्या आड जाऊन तो भोंवरा फिरवूं लागला. वेगानें फिरताना किती लालभडक दिसायचा तो. जणूं

काहीं त्रिंबकेश्वराच्या देवळापुढच्या तळ्यातील तावडें लाल कमळच ! आणि वेग कमी झाल्यावर तो मान हलवायचा ती तरी किती डौलदार !

इतक्यात शेटजींचा मुलगा मागून आला. आणि त्यानें तो भोंवरा झटकन् उचलून घेतला. गणूला राग आला. त्यानें त्याच्या हातातील भोंवरा हिसकावून घेतला, आणि त्याच्या पाठींत एक सुंदर रट्टा ठेवून दिला. शेटजींचा मुलगा रडत गेला.

थोड्या वेळानें गणूच्या कानावर कडकडाट आला. मागोमाग मालकीणबाई आल्या. मागोमाग पाठींत एक धपाटा बसला. हातातला भोंवरा गेला आणि मग मालकीणबाईनीं आपल्या मुलाला अगदीं घट्ट हृदयाशीं धरलें आणि त्याचे डोळे पुशीत त्यानीं त्याची अगदीं गोड शब्दात समजूत काढली.

आणि मग गणूच्या डोक्यात एक वेडी कल्पना आली कीं आपणसुद्धा त्या रागीट मालकिणीच्या कुशींत डोकें खुपसावें आणि तिनें आपली मधुर आवाजात समजूत काढावी—गणूला त्या रात्रीं जेवण मिळालें नाहीं.

एक तारीख होती. गणूचा पगार झाला. आणि आपला मौल्यवान् पगार हातात घट्ट धरून आता त्याचें काय करावें ह्याचा विचार तो करीत होता. इतक्यात रघूसुद्धा आपला पगार घेऊन तिथें आला आणि गणूच्या पाठीवर थाप मारून म्हणाला, आता पहिली गोष्ट म्हणजे छोट्या भिकूला अंगातलें आणायचें. येतोस का बाजारात ? दोघे बाजारात गेले आणि त्यानीं भिकूला एक छानदार भडक रंगाचें अंगातलें घेतलें. मग तें हातात आल्यावर भिकू कसा नाचला, आणि त्याला नाचताना पाहून रघू कसा खिदळला, आणि त्याचें खिदळणें पाहून रघूच्या बायकोनें कसा रागावल्याचा बहाणा केला तें गणूला अजून डोळ्यासमोर स्पष्ट दिसत होतें. आणि गणूला वाटलें होतें कीं, आपण सुद्धा असें भडक रंगाचें अंगातलें कोणाला तरी आणून द्यावें आणि मग अगदीं रघूसारखें खिदळावें. आणि अशा वेळीं आपल्यावर रागावल्याचा कोणीं बहाणा केला तर किती मौज उडेल !— गणूनें त्या पगाराच्या आपल्यासाठीं किती तरी वस्तू घेतल्या होत्या, आणि तरी त्याचें समाधान झालें नव्हतें.

रखमा मोलकरणीला पगार फार थोडा होता. पण तिचीं पातळें मोठीं

भपकेबाज असत, आणि आपले काळेभोर तुळतुळीत केस तरी ती किती चापचोपून बसवीत असे.

आपल्या चोळींत न मावणाऱ्या स्तनभाराची निष्कारण हालचाल करीत ती छोट्या मालकाच्या खोलींत गेली आणि खोली झाडता झाडता तिनें छोट्या मालकाच्या अंगावर फडका मारला तो तरी किती सफाईनें. मग छोट्या मालकानीं तिचे दोन्ही हात पकडले होते, आणि हलक्या आवाजात थोडा वेळ कुजबूज झाली होती. मग क्षणभर एकदम रखमा दिसेनाशी झाली आणि ती जेव्हा बाहेर पडली तेव्हा तिचे चापचोपून बसविलेले केस विसकटून गेले होते आणि तिच्या डोळयात कसली तरी मस्त धुंदी तर-ळत होती!

गणूला वाटलें कीं, आपणसुद्धा रखमाचे चापचोपून बसविलेले केस असेच विसकटून टाकावे आणि त्या विचाराच्या गुंगींत तो दारातून दूर सरकायला विसरला. गणूला दारात उभा असलेला पाहून छोट्या मालकानीं त्याला चागला सज्जड दम दिला, आणि कामचुकारपणा न करण्याबद्दल बजावलें. आणि रखमा गणूकडे पाहून फिदीफिदी हंसत तेथून मोठ्या डौलानें निघून गेली.

* * *

गणूची विचारशृंखाला किती लाबली असती कोण जाणे! पण इतक्यात त्याची मालकीण ओरडली "काय रे गणू, किती दिवस लागणार आहेत भाडीं घासायला?" गणूनें सुस्कारा सोडला आणि तो भाडीं विसळूं लागला. कुठून हें लग्नाचें संकट आपल्यावर आलें आहे कोण जाणे! असा त्रासिक विचार त्याच्या मनात आल्यावाचून राहिला नाहीं.

काम आटोपल्यावर गणू भीत भीत शेटजींच्या पुढें गेला आणि म्हणाला "शेट, जाऊं मी आता घरीं?" हिशोबाच्या वह्यावरची आपली दृष्टि न उचलता शेटजी म्हणाले "हा." गणू घाईनें निघाला. अजून त्यानें जानकीला पाहिली देखील नव्हती धडपणें. पण तो पायऱ्या उतरत असता शेटजींची हाक आली गणू तसाच मागे फिरला.

"अरे गणू, मीं तर साफ विसरून गेलों होतों. दुकानावर कोणी देखील नाहीं. बस बघूं जरा तासभर." 'जरा' आणि 'तासभर'!

गणूला वाटलें कीं शेटजी आपल्याला तासभर तापलेल्या तव्या-वर बसायला तितक्याच सहजतेनें सांगतील. गणूनें सुस्कारा सोडला. त्याला आपलें मन मारायची इतकी संवय झाली होती कीं, शेटजींचा त्याला राग आला नाहीं, अथवा त्यानें आपल्या दैवाला दोषही दिला नाहीं. शांतपणें तो दुकानात जाऊन बसला.

दाराला डोकें टेकून दूरदूर सरकणाऱ्या त्या विचित्र भेटीविषयीं तो विचार करीत होता. इतक्यात त्याच्या पाठींत एक जोराची थाप बसली. रघू ड्रायव्हर होता तो. शेटजींच्या देखील पाठींत तो थाप कशी मारीत नाहीं, ह्याचें गणूला आश्चर्य वाटलें. मग रघू त्याच्या गळ्यात हात घालून म्हणाला, "काय दोस्त, चैन आहे बुवा तुझी. मिय्या-बिबीचा संसार! पण मला जेवायला बोलावलें पाहिजे हं! आणि हें बघ, बायकोला अशी दमात घेशील कीं यंव! नाहीं तर माझ्या बायकोसारखी डोक्यावर चढून बसेल हं!" आपली बायको आपल्या डोक्यावर बसली आहे अशी एक रघूची आव-डती कल्पना होती. आणि ती पुनःपुन्हा बोलून दाखवण्यात त्याला मोठी मौज वाटत असे. रघू असा पुष्कळ वेळ चऱ्हाट वळीत बसला होता. पण गणूनें त्याच्याकडे विशेष लक्षच दिलें नाहीं. तासभर झाला तशी त्यानें दुकानाला कुलूप लावलें आणि झपाझप पावलें टाकीत तो घरीं निघाला!

आणि एकदम अंगात कसली तरी उष्णता भरल्यासारखें त्याला वाटलें. घरीं न जाता दूर कुठेंतरी पळून जावें असें त्याला वाटूं लागलें. डोळ्या-वरचा चष्मा सरसावीत आपली बायको आपल्याला शेटजीप्रमाणें दरडा-वील असें त्याला वाटलें. त्याला वाटलें रखमा मोलकरणीसारखी आपल्याकडे धुंद नजरेनें पहात ती फिदिफिदी हंसेल. आणि रघूची उंच फरची टोपी आपल्या डोक्यावर असती तर फार बरें झालें असतें अशीही विचित्र कल्पना त्याच्या डोक्यात चमकून गेली.

वाटेंत एक नारियलवाला शहाळीं विकीत बसला होता. इतक्यात एक गिऱ्हाइक आलें. 'अच्छावाला माल निकालो' अशी त्याची ऑर्डर ऐक-ताच एक चांगल्यापैकीं शहाळें उचलल्याचा आविर्भाव करून तो नारियेल-वाला त्याचीं सपासप शकलें उडवूं लागला.

गणूला त्या उडणाऱ्या शकलाची मोठी गंमत वाटली. आणि मग

त्याला आपणसुद्धा शकलेंच उडवीत चाललों आहों असें वाटूं लागलें. आणि घरीं जाईतों त्याने अनेक शकलें उडविलीं होतीं, आणि तो अगदीं धुंद होऊन गेला होता.

त्या दिवशीं खोलीचें दार उघडेंच होतें. आणि कुलूप न काढता आपण घरात शिरलों ह्याची त्याला मोठी गंमत वाटली. त्यानें आपल्या वाहाणा काढल्या. नेहमीं तो त्या उचलून ठेवीत असे, आज त्यानें त्या तशाच ठेवल्या. आणि त्याला परत गंमत वाटली, त्याला पाय धुवायला पाणीसुद्धा ठेवलें होतें. त्यानें पाय धुतले आणि तो पानावर बसला.

आज काहीं तो मालकिणीनें पुढे सारलेलें शिळेंपाकें अन्न खायला पानावर बसला नव्हता. आज मुद्दाम त्याच्याकरिता बनवलेलें ताजें अन्न तो खाणार होता. त्यानें डोळानें आजूबाजूला पाहिलें. त्याची बायको एका कोपऱ्यात मोठ्या अदबीनें उभी होती. त्याने तिच्याकडे नजर फिरविली तशी तिनें अधिकच मान खालीं घातली. आणि कसली तरी अत्यानंदाची ऊर्मि आपल्या अंगातून सळसळून जात आहे असें गणूला वाटलें. तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, "चल वाढ भात. बघत काय बसलीस ?" आणि आपल्याला एवढ्या मोठ्यानें ओरडता येतें याचें त्याला कौतुक वाटलें. जानकी लगबगीनें उठली आणि तिनें त्याला भात वाढला. पानातल्या सर्व वस्तूंचा त्यानें मोठ्या विचारपूर्वक आस्वाद घेतला आणि मग तो खेकसला "काय भात आहे कीं आबोण ! " त्यानें धाडकन् ताट आपटले, त्या आवाजानें जानकी किती पण थरारली ! —खूप मजा असते लग्न म्हणजे.

"पाणी जरा जास्त झालं जणूं " जानकी चाचरत म्हणाली. "लाज नाहीं वाटत बोलायला, भात नाहीं येत करता मग येतें तरी काय करता ! आ !" गणू राक्षसासारखा ओरडला. "उद्या करीन चागला " जानकीनें कसेंबसें उत्तर दिलें.

"जास्त बोलूं नको, सागतोंय. जास्त नको बोलूं ! " आणि गणूनें मागचा पुढचा विचार न करता आपल्याजवळचें पाणी पिण्याचें भाडें तिच्या अंगावर भिरकावलें. तें तिच्या पायाच्या घोटयावर बसलें आणि ती मटकन् खालीं बसली. गणूला वाटलें कीं, पटकन् जाऊन तिला विचा-

रावें ' लागलें का तुला ? ' पण त्यानें लगेच आपलें मन दाबलें. त्याची मान ठणकते म्हणून त्याच्या मानेवरचें ओझें कधीं कोणीं उतरलें होतें काय ? आनंदाची आणखी एक छोटी ऊर्मि त्याच्या अंगातून गेली आणि ताठर आवाजात तिला किती तरी कामें करायला सांगून, तो एखाद्या बादशहासारखा बाहेर खाटल्यावर येऊन पडला. आणि समाधानानें विचार करताना त्याला वाटलें, " लग्न लग्न म्हणतात तें हेंच तर नव्हे ? "

इतक्यात शेजारच्या खोलीचें दार उघडलें, दारूची वसकन् घाण आली, आणि थोडयाच वेळात शिव्या, मारणें आणि रडणें ह्याचा संमिश्र आवाज आला. त्या दारुड्या पाडूची गणूला नेहमींप्रमाणें चीड आली. आणि मग तो एकदम दचकला. त्या अंधाऱ्या खोलींत वावरणाऱ्या त्याच्या नव्या ओडीदारणीचे दबलेले हुंदके त्याला ऐकूं येत होते. त्यानें तिच्याकडे परत परत पाहिलें. तिनें सारें काम आटोपलें होतें आणि अगदीं एका कोपऱ्यात एक रकटें टाकून ती आपल्या अंगाची अगदीं जुडी करून झोंपली होती. एक दबलेला हुंदका त्याला परत ऐकूं आला.

गणूला वाटलें कीं भर थंडीच्या दिवसात कोणी तरी कपड्याविना रस्त्याच्या कडेला काकडत पडले आहे. आणि आपल्याजवळचें कांबळें तिच्या अंगावर टाकून तिला ऊब द्यावी आणि तिच्या हुंदक्याचें हंसें करावें, अशा नाजुक इच्छेनें त्याच्या मनात चोरून प्रवेश केला.

आणखी एक हुंदका आला, आणि त्याच वेळीं शेजारच्या खोलींतून मोठा कोलाहल ऐकूं आला. आणि गणू उमाळ्यासरशीं उठला, व जानकीजवळ जाऊन हळूच बसला. तिनें नुकतेच डोळे मिटले होते. आणि तिचा श्वास जरा जड झाला होता. गणूला काय वाटलें कोण जाणे, त्यानें तिच्या पापण्यावर तरंगणारे अश्रु हलकेच पुसून घेतले. आपल्या अंगात इतका नाजुकपणा आला कोठून ह्याचें त्याला आश्चर्य वाटलें आणि कसली तरी गुदगुल्या करणारी संवेदना त्याला उल्हसित करून गेली. आणि परत एकदा तिचे अश्रु तो टिपूं लागला.

जानकी एकदम उठली, आणि जवळ बसलेल्या गणूकडे पाहून ती घाईघाईनें उठूं लागली. पण गणूनें तिला उठूं दिलें नाहीं. आणि एखाद्या लहान मुलाला जवळ घेऊन कुरवाळावें तसें त्यानें तिला कुरवाळलें.

जानकीच्या चेहऱ्यावरून सरकणारे भीति, आश्चर्य, कृतज्ञता हे भाव पाहून त्याला वाटलें कीं, दुसऱ्याचें हृदय फुलविण्याची ही जादू आपल्याजवळ आली तरी कोठून ? जानकी त्याला हलकेंच बिलगली, आणि तिच्या मंद श्वासोच्छ्‌वासाची सुखद उष्णता हृदयाला पुलकित करीत असता त्याला वाटलें कीं, ' लग्न लग्न म्हणतात तें हेंच असण्याचा अधिक संभव आहे. '

आणि मग त्याला काय वाटलें कोण जाणे, तो हळूच खालीं सरकला आणि आपलें मस्तक त्यानें जानकीच्या कुशींत सरकवलें. आणि त्याबरोबर त्या इवल्याशा पोरीच्या मनातील सुप्त वत्सलता जागृत झाली आणि तिनें त्याचें मस्तक आपल्या छातीशीं घट्ट दाबून धरलें. आणि त्या फाटक्या कपड्यांनीं आच्छादिलेल्या दीन वक्षःस्थलाची उष्ण वत्सलता अनुभवीत असता त्यास वाटलें कीं, " लग्न लग्न म्हणतात तें हेंच. "

आणि त्या विचित्र सुखद अनुभवानीं बावरलेल्या आणि गुदमरलेल्या गणूला त्याच वेळीं तंबाखू खाल्ली नाहीं म्हणजे कसें वाटतें तसें वाटूं लागलें. आणि चापचोपून बसवलेले काळे तुकतुकीत केस विसकटून टाकावे अशी प्रबल इच्छा त्याच्या मनात निर्माण झाली.

आणि त्याला वाटलें, " कोण जाणे, लग्न म्हणजे आणखी काय काय असूं शकेल तें ! "

—वाङ्मयशोभा, ऑगस्ट १९४३

# स्वप्नरंजन



शेवटलें पान वाचून वामननें पुस्तक बंद केलें आणि मान वर केली. रीसर्च रूम अंधारून गेली होती आणि टॉवरवरचें घड्याळ मंजुळ आवाजात साडेसात वाजल्याचें सुचवीत होतें.

हातात हात अडकवून त्यानें एक भली मोठी जांभई दिली, वाचनानें जडावलेले आपले डोळे हातानीं चोळले; आणि मग पाय तणावून तो क्षणभर स्वस्थ रेलून बसला.

त्याची मान ठणकत होती. डोकें अगदीं जड झालें होतें. आणि त्याच्या मनाची आणि शरीराची विलक्षण विकल अवस्था झाली होती. नकोत तीं पुस्तकें, नको तो अभ्यास, नको ती परीक्षा..... कुठें तरी दूर निघून जावें असें त्याला वाटत होतें.

भानावर येऊन तो चटकन् उठला आणि पुस्तकें गोळा करून बाहेर पडला. जवळच अभ्यास करीत बसलेल्या एका सुंदर मुलीनें त्याच्याकडे चटकन् एक दृष्टिक्षेप टाकला तो त्याच्या ध्यानात आला. बाहेर दोनचार खादीधारी मुलें आपापसात कुजबुजत होतीं. त्यापैकीं एकाला तो म्हणाला, “ काय रे ! कसली चालली आहे एवढी चर्चा ! ”

“ आमचें आपलें राजकारण. बाकी तुला काय त्याचें म्हणा. तुझा चालूं दे अभ्यास. ” आणि तो स्वतःला देशसेवक समजणारा खादीधारी तरुण विचित्रपणें हंसला.

खिन्नपणें एक सुस्कारा सोडून वामन जिना उतरला. आणि युनिव्हर्सिटी गार्डनमध्यें पाऊल टाकतांच, जणूं भुताखेतानीं भरलेल्या जीर्ण घरातून आपण मोकळ्या निर्व्याज वातावरणात आलों असें त्याला वाटलें.

गार्डनच्या हिरवळीवर बागडणारीं उन्हें पार पळून गेलीं होतीं. कोपऱ्या-कोपऱ्यावर लावलेलीं फुलझाडें निळसर फुलाच्या गेंदानीं कशीं अगदीं बहरून गेलीं होतीं. आणि कॉन्व्होकेशन हॉलच्या परिसरात एक ख्रिश्चन जोडपें परस्पराना बिलगून बसलें होतें.

पाडुरक्या धूसर आकाशाच्या पार्श्वभूमीवर सुळक्यासारखा वर गेलेला तो टॉवर एखाद्या पुराणकालीन अवशेषासारखा भासत होता. एखाद्या बालिकेनें चाहूल लागूं न देता यावें आणि चटकन् गळयाला मिठी मारून 'कसें फसवलें' म्हणून हंसावें तसा वाऱ्याचा खेळ चालला होता. आणि पलीकडून ऐकूं येणारा ट्रॅमचा खणखणाट कुठल्या तरी दुसऱ्या जगातून येत आहे असें वाटत होतें.

तें दृश्य पाहून वामनच्या शिणलेल्या मनाला विलक्षण प्रसन्नता वाटली. किंचित् शीळ घातल्यासारखें त्यानें केलें. आणि मग सुंदरसा चहा प्यावा अशा विचारानें त्यानें 'वेसाइड इन्' कडे आपला मोर्चा वळवला.

एका कोपऱ्यातल्या टेबलाजवळ तो बसला आणि त्यानें चहाची ऑर्डर दिली. त्या झगझगणाऱ्या विद्युत्प्रकाशात त्याला अधिकच प्रसन्नता वाटली. पांढऱ्या शुभ्र कपड्यात वेगानें इकडे तिकडे जाणारे वेटर्स, काट्याचमच्याचा किणकिणाट आणि युरोपियन स्त्रीपुरुषाचा मिश्र हास्यध्वनि...हळूहळू कसली तरी सूक्ष्म गुंगी त्याच्या मनावर पसरूं लागली. वृत्ति अंतर्मुख झाली. मनाची एकतान झाली.

* * *

...निळया रंगाची छोटी सुबक गाडी हॉटेलच्या दाराशीं येऊन थडकली. निळया मखमली चप्पलमध्यें खुलणारें एक पाऊल बाहेर डोकावलें आणि मग अस्मानी रगाचें पातळ नेसलेली एक तरुणी चटकन् खालीं उतरली. ती उतरली तेव्हा तिच्या पर्सआडून तिचें वक्षःस्थळ थरारलें तें त्याला स्पष्ट दिसलें.

तिची निळसर स्निग्ध खेळकर दृष्टि जेव्हा तिनें वामनच्या बाजूला फिरवली तेव्हा तो एकदम चमकला...नीला होती ती; आणि एक उष्ण लाट त्याच्या शरीरभर पसरली.

तिनें जेव्हा हॉटेलात प्रवेश केला तेव्हां चटकन् त्यानें आपली नजर

दुसरीकडे फिरवली. तिनें त्याच्याकडे पाहिलें—तो तिच्याकडे पाहात नव्हता तरी त्याला तें समजलें.

मृदु सुगंधाची एक लकेर दरवळली, रेशमी पातळ सळसळलें, आणि मग जलतरंग वाजावे तसा स्वर कानावर आला "कसला एवढा विचार चालला आहे?"

तो हंसून म्हणाला, "दुसऱ्या कोणाचा? तुझाच."

"इश्श" म्हणून लाजून तिनें दृष्टि खालीं वळवली आणि विविध भावछटा तिच्या चेहेऱ्यावर उसळल्या. जणुं उसळलेल्या तुषारावर दिसणारें इंद्रधनुष्य.

त्या मनोरम संभ्रमाकडे पाहात तो म्हणाला, "आणि माझ्या कल्पनेंत दिसत होतीस, त्याहूनहि तूं आता सुंदर दिसत आहेस."

"अशानें मी जाईन हं इथून." ती लटक्या रुसव्यानें म्हणाली. नर्तिकेचें लालित्य तिच्या हालचालींत होतें.

"बरें, बरें. आता नाहीं" आणि तिचा हात धरून त्यानें तिला शेजारच्या खुर्चीवर बसवलें व आणखी चहा मागवला.

"फार वेळ नाहीं हं बसायचं इथं."

"म्हणजे?"

"आपण आता मेट्रोला जायचं." ती लाजत म्हणाली आणि संमतीच्या अपेक्षेनें तिनें आपले विशाल नील नेत्र त्याच्याकडे लावले.

"आणि मी नाहीं आलों तर?"

"आलेंच पाहिजे." ती ठसक्यात म्हणाली.

"तें का बुवा?"

"मला नाहीं माहीत." ती लाजली आणि विषय बदलायच्या हेतूनें तिनें विचारलें. "साखर पाहिजे का आणखी?"

"अं......हो." तो तिच्या डोळ्याकडे पाहात म्हणाला.

"अं हो काय? साखर कमी लागते ना तुम्हाला?" ती त्याच्या नजरेला नजर देत म्हणाली.

"तुला कसें माहीत?"

तिनें चटकन् नजर खालीं वळवली आणि मग हलक्या आवाजात ती म्हणाली, "तुम्ही लोकाना विसरलात तरी लोक नाहीं विसरत तुम्हाला..."

मोटार वेगानें चालू लागली. कसला तरी विद्युत्प्रवाह शरिरातून चालू आहे असें त्याला वाटत होतें. किंचित् शरीरस्पर्श होत होता. लज्जेनें अवनत झालेली आपली दृष्टि वर करून तिने त्याच्या नेत्रात कांहीं तरी शोधण्याचा प्रयत्न केला. नजरानजर झाली आणि मोटारीनें मोठें वळण घेतल्यामुळें ती त्याच्या अंगावर रेलली. चटकन् त्यानें तिला जवळ ओढलें व दृढ आलिंगन दिलें.

तिचें मृदु मांसल शरीर त्याच्या बाहुपाशात लुप्त झालें, अगदीं चुरून गेलें आणि तिचे उरोज त्याला किती लाडिक विरोध करीत होते! तिच्या मृदु त्वचेच्या, रेशमी वस्त्राच्या आणि सुगंधी केशकलापाच्या स्पर्शानें आलेली धुंदी त्याच्या नसानसातून तुडुंब भरली आणि आपल्या शरिरात निर्माण झालेल्या उन्मादकारक लहरींच्या तप्त कल्लोळात तो गुदमरून गेला......

मोठ्या प्रयासानें वामननें स्वतःचें मन आवरलें. ही शरिराची अतृप्ति कधीं संपत नाहीं, वाढतच जाते हें त्याला माहित होतें.

* * *

आपण देशसेवक आहोंत अशा उसन्या ऐटीनें मिरविणाऱ्या खादीधारी मुलाचें तें टोळकें ओरडत खिदळत हॉटेलात शिरलें. तें काहीं तरी मूर्खपणाचें बोलत असावें ह्याची त्याला खात्री होती. विलक्षण तिरस्काराचा दृष्टिक्षेप त्यानें त्याच्याकडे टाकला. गांधीजींचे शब्द त्याला आठवले, India is a vast prison आणि का कोण जाणे एकदम त्याचा कंठ दाटून आला.

......तापलेल्या धूळभरल्या रस्त्यातून तो वहाणा करकरावीत चालला होता. अजून दोन मैलाचा पल्ला होता. घामाच्या धारा चेहऱ्यावरून निथळत होत्या. धोतराच्या सोग्यानें त्यानें आपला चेहेरा निपटून काढला. आणि अंमळ सावलींत तो उभा राहिला.

पलीकडे शेतात बांधाच्या शेजारीं एक मूल धुळींत तडफडत होतें आणि बसक्या आवाजात रडत होतें. पलीकडे लाकडें तोडल्याचा आवाज येत होता. त्या मुलाची आई लाकडें तोडीत–तोडीत कसलीं–चोरत होती..

खेडेगावात लाकडें चोरणें हा प्रतिष्ठित गुन्हा आहे. सारे लोक तो हौसेनें करतात.

त्या मुलाकडे जाऊन त्यानें त्याला उचललें. मानवी शरिराच्या स्पर्शानें त्याला काय सुख झालें कोण जाणे! पण तें त्याला बिलगलें. रडणें थांबलें आणि मग तें त्याच्या छातीशीं झटूं लागलें. त्याला काय हवें होतें तें वामनला समजलें.

ही सात लाख खेड्याना जाळणारी भूक अंशतः तरी कमी करावी म्हणून ना तो बापूजींच्या आदेशावरून खेड्यात आला होता!

जिल्ह्याच्या गावात त्याला किती तरी कामें उरकावयाचीं होतीं. खादीविक्रीचा हिशेब पाहायचा होता. ग्रामोद्योग आश्रमात नवीन प्रकारच्या वस्तू तयार करण्याचा उपक्रम कितपत यशस्वी झाला होता तें पाहायचें होतें आणि शिवाय त्याच्या छोट्या सहकारी संस्थेचीं आणि शाळेचीं कामें होतींच.

आणि खरेंच! काशा घरताचें औषध आणायचें होतें. तो कसला जगतो म्हणा आता! आणि मेला तरी त्याचा संसार थोडाच कोरडा पडणार होता. खेड्यातल्या कुटुंबात प्रत्येकजण स्वावलंबी असतो. त्याचा तो चुणचुणीत मुलगा मात्र आपली शाळा सोडून गुरें राखायला जाईल. छे, छे, असें होता कामा नये.

त्या मुलाची आई डोक्यावर मोळी तोलीत तेथें आली. त्या मुलाचे बखोट धरून तिनें त्याला कमरेवर सावरलें. आभार कसले? डोळ्यात काय कृतज्ञता उतरली असेल तेवढीच.

झपाझप पावलें टाकीत वामन निघाला. किती काम होतें? खूपच अज्ञान, हेवेदावे, क्षुद्रपणा, दारिद्र्य ह्या सर्वांची हकालपट्टी करावयाची होती. एक छोटें सुबक नवें जग निर्माण करायचें होतें. गांधींचें ‘ रामराज्य ’!

ह्या प्रचंड यान्त्रिक संस्कृतीवर त्याचा विश्वास नव्हता. ह्या संस्कृतीच्या नावाखालीं मानवी मनातल्या साऱ्या विकृत प्रवृत्ति जगभर थैमान घालीत आहेत. येऊन जाऊन तिनें काय साधलें? प्रचंड राज्ययंत्रें, औद्योगिक संघटना आणि सामान्य माणसाच्या व्यक्तिमत्त्वाचा चुराडा आणि सुख?

कसलें सुख ? सुख मानवी हृदयात आहे. यंत्रांतून, स्पर्धेतून तें कसें निर्माण होईल ?

ह्या नव्या जगाकरिता हजारों झटत होते. आणखी हजारोंनीं झटायला पाहिजे होतें. ह्या हजारोंतला तो एक होता इतकेंच ! दुसरें काय !

* * *

......वामनच्या कल्पनेनें एक मोठी झेंप घेतली.

......आनंदाचा केवढा प्रचंड कल्लोळ उडाला होता. लोक नुसते बेहोष झाले होते. बायका, मुलें, पुरुष सारीं ओरडत होतीं, नाचत होतीं, परस्पराना मिठया मारीत होतीं. ध्वज फडकत होते. क्रांतिगीताचे स्वर बदसूर-पणें उमटत होते. जयजयकाराचा घोष अखंड चालला होता.

स्वातंत्र्याचा हा पहिला विलक्षण अनुभव होता.

लोक वेडे असतील. त्याना आपली जबाबदारी कळत नसेल. पण हा विशुद्ध आनंद कोण दडपणार ? ज्या क्रांतीच्या क्षणाची इतक्या उत्सुकतेनें वाट पाहिली तो आला होता ना ! त्याचें स्वागत करा.

प्रचंड जयजयकार झाला. लोकाचा पुढारी आला होता. कपड्याचीं लक्तरें झालीं होतीं. रक्ताचे डाग अजून वाळले नव्हते. दर पदक्षेपात विलक्षण निश्चय होता. छाती म्हणजे धैर्याचा कोट होता. चेहरा विचार-शील होता. दृष्टि स्नेहमयी होती.

अरे ! हा तर वामनच होता कीं ! तो पुढारी कधीं झाला ? साधा शिपाई तो ? त्याला तरी कुठें कळलें होतें तें नीटसें !

तो व्यासपीठावर उभा राहिला. हात वर करून त्यानें हास्य केलें. हास्य ? होय, क्रांतीच्या चेहेऱ्यावर विशाल सहानुभूतीचें हास्यच पाहिजे.

जवळच वावरणाऱ्या एका चुणचुणीत निळया डोळयाच्या मुलीकडे त्याच लक्ष गेलें न गेलें इतकेंच. प्रचंड जनसंमर्दाकडे त्याची नजर वळली.

"......मित्रानो, क्रांतीचा हा महायज्ञ आता संपला आहे. ह्या यज्ञात अनेकानीं आत्माहुति दिली आणि आपण सर्वांनीं मिळून एका पाशवी सत्तेची आहुति दिली. पण आत्मशुद्धीचें पुण्य अजून पुरतें आपल्या पदरात पडलें नाहीं हें ध्यानात ठेवा

" अनेकाच्या रक्तानें माखलेला असा हा क्रांतिकाल होता. चागल्या वाईट

साऱ्या गोष्टींचा ह्यानें विध्वंस केला. गुलामगिरी गेली. पण त्याबरोबर शांतता गेली आणि सुव्यवस्थाहि! विषमता गेली पण दारिद्र्य बळावलें. स्वार्थ-त्यागाची पराकाष्ठा झाली, पण त्याबरोबर क्षुद्र भावनांनीं गोंडस नावाखालीं नंगा नाच घातला. लोकसत्तेचा उदय झाला पण सहिष्णु वृत्ति लोपली.

"आता आपण सारे थकलों आहोंत. पण आपला प्रवास अजून संपला नाहीं. दूरवर त्या पर्वतशिखरावर तुम्हाला एक सुंदर नगर दिसत नाहीं का? मला तें स्पष्टपणें दिसत आहे. तिथें आपल्याला जायचें आहे. त्या नगरात..."

...कुठूनशी एक गोळी आली व त्याच्या छातींतून आरपार गेली. तो खालीं कोसळला. जखमेंतून रक्ताची धार लागली होती. ओंठातून हास्य सांडत होतें. डोळे ताणून ताणून त्यानें पाहिलें. एक निळ्या डोळ्याची चुणचुणीत मुलगी नेत्रांनीं प्रीतीचा वर्षाव करीत होती. पलीकडे अस्पष्टपणें जनसंमर्द पसरला होता......

त्या उदात्त अनुभूतीनें वामनच्या हृदयाची विलक्षण विकल अवस्था झाली. कांहीं वेळ तो स्तब्ध राहिला. हळूहळू अंतःकरणात उसळलेल्या तीव्र भावना शांत झाल्या. आणि मग त्याच्या कल्पनेनें वास्तवाचें बंधन तोडून हलक्या पावलांनीं एका नव्या सुंदर सृष्टींत प्रवेश केला.

...हातात हात घालून तीं दोघें चाललीं होतीं. काळाला आव्हान देणाऱ्या भव्य निळया पर्वतश्रेणी दूरवर पसरल्या होत्या. नील जलानें तुडुंब भरलेलीं सरोवरें, हिरव्या—पिवळ्या पर्णसंभारानीं नटलेल्या भव्य वृक्षराजी आणि विविधरंगी पुष्पाचे गालिचे उलगडणारे लताकुंज ह्यांनीं तो प्रदेश भरून गेला होता. तेथें मऊ तांबड्या पाऊलवाटा होत्या, लडिवाळ निर्झर होते आणि कोसळणारे प्रपातहि होते.

त्यांनीं फुलपाखराची क्रीडा पाहिली. भुंग्याचा उन्मत्त गुंजारव ऐकला. आणि प्रेमवेड्या कपोतयुगुलाची आतुरता अनुभवली.

इतक्यात सोसाट्याचा वारा सुटला. प्रचंड मेघाच्या रांगा आकाशाच्या प्रांगणात उतरल्या. जणुं युद्धाला सज्ज झालेल्या अफाट सेनासंभाराच्या हालचाली सुरू झाल्या होत्या! भयानक गडगडाटानें सारें आसमंत दणाणून गेलें. झाडें पिळवटून निघालीं, जलाशय अस्वस्थ झाले आणि पर्वतावर कसली तरी धुंदी चढली.

धूळ उडाली, काळोख साखळला आणि विद्युल्लतेच्या पिसाट दीप्तीनें क्षणमात्र सारा प्रदेश उजळला. टपोऱ्या थेंबानीं भराभरा उड्या घेतल्या आणि मग कोसळणाऱ्या जलधारानीं सारा प्रदेश व्यापून टाकला.

तीं दोघें स्तिमित होऊन त्या विलक्षण दृश्याकडे पाहात होतीं. त्याच्या हृदयाची देखील तशीच अवस्था झाली नव्हती काय ? आसऱ्यासारखीं वाटणारीं जुनीं बंधनें तुटून पडत होतीं. अज्ञात नवीन प्रदेशाचें दर्शन होत होतें. मनाचीं क्षितिजें रुंदावत होतीं. अननुभूत अशा प्रभावी भावना, वादळी विचार, विशाल अस्पष्ट आकांक्षा यांचा केवढा संग्राम त्याच्या हृदयात माजला होता !

त्यानीं परस्पराकडे पाहिलें. ती म्हणाली, "मला भीति वाटते." तो म्हणाला, "छे छे; वेडे, भ्यायचें कशाला ? तुटणाऱ्या बंधनाचा हा कर्णकटु आवाज आहे इतकेंच."

......मेघमाला पांगल्या. लपलेलीं उन्हें अलगद हिरवळीवर उतरून इतस्ततः बागडूं लागलीं. जलबिंदूंचीं रत्नें झालीं. वृक्षराजी नव्या चैतन्यानें थरारल्या आणि पंख फडफडावून पक्षानीं भराऱ्या घेतल्या.

विलक्षण आनंदाचा आणि शांततेचा अनुभव येत होता. ओंठावर हास्य होतें. डोळ्यात अश्रु तरंगत होते. तो आनंद होता कीं दुःख होतें ? विलक्षण समाधान होतें एवढें मात्र खरें.

एका चिमुकल्या मेघखंडावर बसून तीं खूप वर गेलीं. प्रकाशमय आकाशातून त्यानीं दूरवर प्रवास केला. नितांत शांततेचें हृदयस्पंदन त्यानीं ऐकलें आणि अनंताच्या शांत जलाशयांत जाणिवेचा खडा टाकून उठलेले तरंग त्यानीं पाहिले. मी—तूं—पण हरपलें, सारेंच तन्मय झालें.

* * *

......कसल्याशा आवाजानें वामन एकदम भानावर आला. त्यानें घड्याळात पाहिलें तों साडेआठ वाजले होते. त्यानें एक सुस्कारा सोडला आणि तो घराची वाट चालूं लागला. आपले डोळे ओलावले आहेत असें त्याला वाटलें आणि रस्त्यातून कोणीसा चष्मेवाला साहित्यिक प्रतिपादन करीत चालला होता, वाङ्मयातून स्वप्नरंजन नाहींसें झालें पाहिजे......

—वाङ्मयशोभा, नोव्हेंबर १९४५

# रिकामी बस ४

खिडकी उघडावी अशी तात्याना विशेष इच्छा झाली होती म्हणून नव्हे तर 'काहीं तरी कर' म्हणून मनाच्या कुठच्या तरी कोपऱ्यातून विलक्षण जोराची प्रेरणा मिळाल्यामुळेंच तात्यानीं खिडकी उघडली. खिडकीचें दार उघडेना. तात्यानीं जोरानें ढोसकलें तेव्हा कुठें तें कुरकुरत उघडलें. आपल्या मनाच्या प्रेरणेप्रमाणें वागताना तात्यादेखील असेच कुरकुरले होते.

आणि मग तात्यानीं रस्त्याकडे दृष्टि टाकली ती देखील अशीच निव्वळ निष्क्रियपणें.

खाली रस्त्यात रहदारीची केवढी गर्दी उसळली होती ! मोटारीचे ताफेच्या ताफे भरधाव चालले होते आणि ओझ्याखालीं वाकलेले हेलकरी, बेफिकीर कॉलेज विद्यार्थी, पोक्त संसारी गृहस्थ व भाजीखरेदीच्या मिषानें बाहेर पडलेल्या तरुण स्त्रिया अशा किती तरी विविध प्रकारच्या माणसाची धावपळ रस्त्यातून चालली होती.

रस्त्यात उभें राहून दोन चार छोटीं छोटीं मुलें उगीचच मोठमोठ्यानें शिट्या वाजवीत होतीं. मग असा हृदयात न मावणारा कुठचा विलक्षण आनंद त्याना प्रकट करायचा होता कोण जाणे !

त्या शहरातील जीविताचीं चक्रें मोठ्या वेगानें फिरत होतीं ह्यात शंका नाहीं. प्रत्येकजण कसल्या तरी उत्कंठेनें चालला होता, कुठल्या तरी कामात गुंतला होता, आपल्या गर्दीच्या जीवनक्रमात अगदीं गुंगून–बुडून गेला होता.

त्या गडबडीच्या वातावरणांत, रस्त्याच्या कडेला पडून राहिलेली एक

बिघडलेली रिकामी बस मोठी विचित्र दिसत होती. तिच्या भोंवतीं खळाळून वाहाणाऱ्या जीवनप्रवाहाचा जणुं तिला स्पर्श देखील होऊं शकत नव्हता.

कसली विलक्षण घाई ह्या लोकाना लागून राहिली आहे? करतात तरी काय बुवा हे लोक ! असे कांहींसे अस्पष्ट तुटक विचार तात्याच्या मनात उमटले. ह्या विषयावर आश्चर्य प्रगट करावें अगर विचार करावा असें तात्याना वाटत होतें म्हणून नव्हे तर विचार करणें ही मनाची एक नैसर्गिक क्रिया आहे म्हणूनच ते विचार त्याच्या मनात उमटले.

एरवीं तात्याची स्थिति त्या रिकाम्या बससारखीच झाली होती. आयुष्या-तील गति नष्ट झाली होती.निश्चित दिशा राहिली नव्हती. ठरीव दिनक्रमाच्या चाकोरींतून ते निष्क्रियपणें कुरकुरत फिरत होते आणि रिकाम्या वेळाच्या उजाड वाळवंटात तडफडत होते.

अतिशय कडक-जवळजवळ क्रूर असलेल्या काकाच्या जवळ तात्याचें लहानपणचें आयुष्य गेलें होतें. काकानीं ऊठ म्हटलें उठायचें. अभ्यास कर म्हटलें अभ्यास करायचा आणि काम कर म्हटलें काम करायचें, असा होता त्याचा आयुष्यक्रम.

एक दिवस त्याना आरल्या शाळेचा एक सामना पाहायची विलक्षण इच्छा झाली. खूप खूप विचार केला त्यानीं. आपलीं सारीं कामे उरकून टाकलीं, आणि काका सोवळ्यानें देवपूजा करीत आहेत असें पाहून ते त्याच्या पाठीमागें जाऊन उभे राहिले. घशाला कोरड पडली. छाती केव-ळ्यानें तरी धडधडूं लागली. इतकी कीं, ती धडधड काकाना ऐकायला जाऊं नये म्हणून लहानग्या तात्यानीं छातीवर घट्ट हात धरून ठेवले.

काकानीं गुरकावलें " काय रे ! "

" काहीं नाहीं, काहीं नाहीं." तात्या घोटाळले.

" बोल कीं." जरा हलक्या आवजात काका म्हणाले. आपल्या क्रूर-पणाला आता वाव मिळणार ह्या आनंदानें त्याच्या आवाजातला जोर कमी झाला असावा किंवा हें भक्ष्य आपल्या तावडींतून सुटूं नये म्हणून त्यानीं आपल्या आवाजात मार्दव आणलें होतें कीं काय कोण जाणे !

तात्यानीं आपली इच्छा त्याना सांगितली मात्र. त्याच्या काकांनीं विलक्षण आसुरी अवतार धारण केला. आपल्या सोंवळ्याची देखील त्यांना आठवण

राहिली नाहीं. तात्याना त्यानीं बेदम मारलें आणि काकू जेव्हां त्याना सोड-वायला आल्या तेव्हा त्यानाही प्रसाद मिळाल्यावाचून राहिला नाहीं.

दोन—तीन दिवस तात्या तापानें फणफणले होते आणि त्यानंतर त्याच्या मनाला इतकी विलक्षण जबरदस्त धास्ती बसली होती कीं, आपल्या इच्छा प्रगट करणें तर राहूं द्याच, पण एखादा बंडखोर विचार जरी मनात आला तरी ते घाबरून दचकत असत.

तात्याना कुठेंशी नोकरी लावून देऊन आणि त्याचें लग्न उरकून, त्यांच्या काकानीं आपली इहलोकींची यात्रा आटपली होती.

त्यानंतर लांब केस वाढवावे, चंची बाळगावी, रात्रीं नाटकाला जावें असे विचित्र विचार तात्याच्या डोक्यात डोकावूं लागले होते. पण 'काय होतें आहे' हें तात्याना कळण्यापूर्वींच त्याच्या पत्नीनें त्याच्या आयुष्याचा ताबा घेतला. विरोध करायची तात्याना संवय नव्हती आणि संवय असती तरी बायकोपुढें त्याचा पाड लागला नसता. आणि परत आपल्या बायकोच्या धाकात तात्या आयुष्य कंठूं लागले.

त्याची बायको जबरदस्त, शहाणी आणि प्रेमळ होती, त्यामुळें त्याचें आयुष्य सुरळीतपणें चाललें होतें. 'आता काय करायचें' हा प्रश्न त्याना पडत नव्हता. तें परस्पर ठरवलें जात होतें आणि त्याच्या भित्र्या मनाला आता तेंच बरें वाटत होतें.

कधीं कधीं ते कंटाळत, त्रासून जात. "घोंडोपंताकडे जाऊन या," असें बायकोनें म्हटलें म्हणजे एखाद्या वेळीं ते जोरानें स्वयंपाकघरात जात. त्याचें अंग थरथर कापूं लागे. आधींच तोतरा असलेला त्याचा आवाज अधिकच तोतरा होई, आणि विलक्षण हातवारे करून ते म्हणत, "हें काय ! हें काय ! किती हा त्रास !" आणि पुढचे शब्द तोंडातच राहून हातवारे मात्र होत असत.

काळ चालला होता. तात्यानीं पेन्शन घेतलें, डोक्यावरचा कडक साहेब गेला. वार्धक्यामुळें बायकोचा स्वभावही हळूहळू नरमला. धाकाचें दडपण थोडें उचललें गेलें. आणि आता मोठा झालेला त्याचा हुषार पण सात्त्विक मनोवृत्तीचा मुलगा आईला म्हणे, "हें काय ग आई, तूं तात्याना उगीचच बोलतेस, मला नाहीं तें आवडत."

तात्याना उगीचच अस्वस्थपणा वाटूं लागला होता. कधीं कधीं उगी-चच दाढी ओरबाडायची, नाहीं तर हात चोळायची त्याना संवय होती ती आतां फारच वाढली. एखाद्या खराब, फाटक्या व बोळा करून कोप-ऱ्यात टाकलेल्या धोतरासारखे आपण आहोंत असें त्याना कधीं कधीं वाटे

आणि थोड्याच दिवसात त्याची पत्नी निवर्तली आणि काचेचें दडपण उचललें म्हणजे जसे कागद उडून जातात, त्याप्रमाणें त्याच्या आयुष्यातील अर्थ, गति, घटना सर्व कांहीं नष्ट झालीं. वस्ती नसलेल्या एखाद्या भयाण पडक्या घराप्रमाणें त्याचें आयुष्य झालें.

त्याच्या व्यक्तिमत्वाची वाढ अशी कधीं झाली नव्हती. प्रत्येकाच्या मनोवृत्तींचा, विचाराचा, ध्येयाचा जो एक कल निर्माण होतो तो त्याच्या बाबतींत निर्माण झाला नव्हता. ज्या कुठच्या प्रभावी व्यक्तिमत्वाची छाया त्याच्यावर पडे तेंच त्याच्या आयुष्याचें केंद्रस्थान होई. पण दुर्दैवानें आतां तसें व्यक्तिमत्वच उरलें नव्हतें. मुलगा कामांत असे. सून दुर्लक्ष करी. आणि म्हणून सारें भयाण अर्थशून्य झालें होतें.

थोडे दिवस जुन्या आठवणींच्या पुरचुंड्या उलगडण्यात गेले. पण आठ-वणींत भर पडत नसली तर त्या फिक्या पडतात, मनरंजनाला असमर्थ ठर-तात. म्हणून एकाकीपणा वाढत चालला. आणि एक विलक्षण भीति पंजा उगारून त्याच्या अंगावर धावून येऊं लागली.

आणि स्वतःचीच भीति वाटणें ह्याहून मोठें दुःख तें कोणतें ?

रात्रीं ते टकटका इकडे तिकडे पहात जागत असत. दिवसा शून्यपणें भ्रमिष्टासारखे बसत असत. कधीं कधीं त्याना वाटे कीं, एक मोठा चाबूक घेऊन सगळ्याना मरेमरेतों मरावें. पण तितक्यात लोकच त्याच्या हातातील चाबूक घेऊन त्याना मारीत आणि मग ते भेदरून जात. कधीं कधीं त्याना वाटे कीं, कसलें तरी तीक्ष्ण शस्त्र घेऊन स्वतःच्या हृदयात खुपसावें, आणि मग त्या जखमेतून वाहणारें रक्त ओंजळी—ओंजळीनें लोकाच्या अंगावर शिंपडावें. खिडकींत उभें राहून लोकाना जोरजोरानें हाका माराव्या असें तर त्याना पुष्कळदाच वाटे.

मग ते हातपाय आवळून तोंड गच्च बंद करून बसून राहात.

*　　*　　*

खिडकी उघडून थोडा वेळ झाला तरी ते शून्यपणानें गॅलरींत जाऊन उभे राहिले. छे, कांहींच घडत नव्हतें. त्याना काहींच काम नव्हतें.

जिना वाजला. कोणी तरी बोललें. हा—सूनबाई, एक दिवसापुरती बहिणी-कडे गेली होती. ती परत आली होती. आ! आणि बरोबर कोण आहे! केवढा दाडगा आवाज! अ......असल्या विचाराशीं ते थोडा वेळ खेळले.

जरा बरें वाटलें. पण नंतर मनाची अस्वस्थता परत वाढूं लागली. त्यानीं दाढी ओरबाडली, हातावर हात चोळले आणि मग परत विमनस्कपणें ते आपल्या खोलींत आले.

एकाएकीं कोणींशी पाठीमागून त्याच्या कमरेला मिठी मारली. तात्या मोठ्यानें ओरडणार होते. पण शब्दच फुटेना. आणि मग एक लठ्ठ गोरा मुलगा मोठमोठ्यानें खिदळत उड्या मारीत घरात निघून गेला. मघाचाच तो दाडगा आवाज!

आपली आश्चर्यचकित दृष्टि त्यानीं इकडे तिकडे फिरवली. आणि त्याच्या मनाला आणखी एक धक्का बसला.

त्याच्या खोलींत जिकडे तिकडे एकच अव्यवस्था माजली होती. त्याची कॉट मध्येंच कुठें तरी वाकडी तिकडी पडली होती. आणि तिला कोणी तरी दोऱ्या बांधून ठेवल्या होत्या. अंथरूण पार विसकटून गेलें होतें. त्याची चंची कुठेंशी दूर कोपऱ्यात जाऊन पडली होती. आणि विडा कुटायचा छोटा खलबत्ता कुठें दिसतच नव्हता. नशीब इतकेंच कीं पाण्याचा तांब्या जागच्या जागीं व्यवस्थित होता.

किती तरी वेळ तात्या दिङ्मूढ होऊन तें दृश्य पहात होते. त्यांच्या आयुष्यात इतकी खळबळ निर्माण करणारी घटना पुष्कळ दिवसात घडली नव्हती. हा एक विलक्षण नवीन अनुभव होता, ह्यात शंका नाहीं.

मागें कधीं तरी बंद पडलेलीं निरनिराळीं मनातील चक्रें एकदम सुरू झालीं. त्या तीव्र अनुमतीनें सारें अंग तप्त होऊन थरथर कांपूं लागलें, आणि कसल्याशा निश्चिततेंत ते उगीचच जोरजोरानें इकडे तिकडे येरझारा घालूं लागले. इतर वेळीं उगीचच अस्वस्थ हालचाल करणारे हात त्यानीं पाठी-मागें एकमेकात अडकविले होते आणि जोरजोरात ते विचार करीत होते.

म्हणजे जोराचे नवे निश्चित विचार नव्हते, पण त्यामुळें निर्माण होणारें ऊबदार सुखदायक मानसिक वातावरण होतें.

स्वतः ते पुटपुटत होते, "हें काय ? असें काय हें ? ह्याचा अर्थ काय ? सगळी नासधूस ! किती त्रास ! उगीचच काय म्हणून पण !"

मग त्यांनीं मोठ्या प्रयासानें आपली कॉट नेहमींच्या जागेवर सरकवली— त्याना ती बरीच जड वाटली. मग त्यांनीं अंथरूण सारखें केलें. चंची व्यवस्थित गुंडाळली.

पण विडा कुटायच्या खलबत्त्याचा कुठें पत्ता लागेना. ते बाहेर आले. आणि हॉलमध्यें त्यांनीं सगळीकडे चाचपून पाहिलें. कुठें मिळेना बेटा !

तात्या स्वतःशींच म्हणाले, "कमाल—कमाल आहे बुवा. कुठें गेला तो. कुठें दवडलान्..."

ते खूप जोरात विचार करीत होते. एखाद्या मोठ्या गुन्ह्याचा छडा लावताना पोलीसखातें देखील इतका कसोशीनें विचार करीत नसेल. त्यांच्या डोक्यात विचार येत होते, थबकत होते, धावत होते, परस्परात गुंतत होते, धाडकन् कोलमडून पडत होते ! केवढी काळजी ! केवढे सूक्ष्म विचार ! केवढा बौद्धिक आनंद !

परत ते जोरात शोध करूं लागले. ते खालीं वाकत. चवड्यावर उभे राहात, डोळ्यानें निरखीत, हातानें चाचपत. किती तरी नव्या वस्तू त्यांच्या हाताला लागल्या. किती तरी जुन्या वस्तूंची नवी ओळख झाली. खूपच वेळ ते रमले.

मध्येंच सूनबाई तिकडून गेली, आणि त्याना पाहून म्हणाली, "इथें काय करता तुम्ही ?"

"काय करणार ? काहीं नाहीं बुवा." तात्या साळसूदपणें म्हणाले. सूनबाई निघून गेली. केवढी युक्ति ! केवढी लबाडी ! केवढें यश ! केवढा आनंद !

जेवायच्या वेळीं तो लठ्ठ गोरटेला मुलगा त्यांच्या शेजारीं बसला होता. मधूनच तो तात्यांच्या अंगावर पाणी उडवी आणि एकदा तर त्यानें त्यांच्या पायाला चिमटाच काढला.

तात्यांना त्याचा राग येऊं लागला. "झोडपून काढला पाहिजे." ते

पुटपुटले. राग खूप वाढला. कित्येक दिवसात त्याना इतका राग आला नव्हता आणि हातपाय बांधलेल्या एखाद्या माणसाचा एखादा हात मोकळा झाल्यावर त्याला जसा आनंद होतो तसा काहींसा आनंद त्याच्या नकळत त्याच्या मनात प्रवेश करीत होता. आणि तो माणूस ज्याप्रमाणें उगीचच त्या मोकळ्या हाताचीच चाळवाचाळव करीत असतो त्याप्रमाणें ते त्या रागाला उगीचच उत्तेजन देत होते.

त्या मुलानें आणखी फाजीलपणा केला असता. पण सूनबाई त्याला ओरडली, आणि त्याच्या मुलानें त्याच्यावर डोळे वटारले.

" छान झालें. " तात्या अर्धवट पुटपुटले आणि त्यानीं विचित्र हातवारे केले.

ते रात्रीं अंथरुणात पडले तेव्हा आपणास पुष्कळ श्रम झाल्याची सुखद जाणीव त्याना परत परत होत होती. आणि त्याच्या डोक्यात विचाराची विलक्षण धावपळ चालली होती. शेवटीं तर काहींसें हंसून त्यानीं दोन्ही हातानीं डोकें धरून ठेवल्यासारखें केलें. जणूं ते त्या विचाराना म्हणत होते, " पुरे बाबानो तुमची ही धावपळ. "

धोंडोपंताना मरून आज वर्ष झालं होतं. पण तात्या कल्पनेनें त्याना भेटायला गेले आणि म्हणाले, "काय व्रात्य पोर हो, काहींच्या बाहींच. नुसता धुमाकूळ मांडलाय घरांत. मिनिटभर शांतता मिळेल तर शपथ..." आणि परत परत त्या गोष्टीची ते उजळणी करीत होते. आणि मध्येंच उठून इकडे तिकडे येरझारा घालीत होते.

रात्रीं जी विलक्षण भीति त्याना वाटत असे ती आज वाटत नव्हती आणि कांहीं वेळानें त्याना इतकी गाढ आणि सुंदर झोंप लागली कीं, ते सकाळीं सात वाजतां जागे झाले.

आणि ते जागे झाले ते देखील त्या लठ्ठ गोरटेल्या मुलाच्या हाकेनें. तो ओरडून सांगत होता, " ती पहा, ती बस चालू झाली. " आणि आश्चर्य म्हणजे तात्यादेखील घाईघाईनें तें दृश्य पाहायला खिडकीजवळ गेले.

बसचें इंजिन थडथडत होतें. ड्रायव्हर आपल्या जाग्यावर स्वार झाला आणि पटकन् त्यानें दार लावून घेतलें. एका हंसऱ्या कंडक्टरनें चटकन्

घंटी वाजविली. तेवढयात दोन-चार उतारू घाईघाईनें त्या बस्‌मध्यें बसले आणि वेगानें मार्गक्रमण करीत ती बस् दूर निघून गेली.

तात्यांच्या अंधुक नजरेला आणि अर्धवट बहिऱ्या कानाना ह्यातलें काहीं विशेष कळलें नाहीं. काहींशी अंधुक हालचाल दिसली इतकेंच.

" चल मूर्ख कुठचा " असें काहींसें हातवारे करून म्हणत ते परत अंथरुणावर बसले. तितक्यात त्याना आपल्या खलबत्त्याची आठवण झाली आणि त्या मुलाला ते म्हणाले,

" माझा बत्ता कुठें आहे ? कुठें ठेवलास तो? का घेतलास ? "

" मला काय माहीत ? " आणि तो मुलगा मोठयानें हंसला.

" तूंच घेतलास तो, खोटं बोलतोस. " ते जोरानें हातवारे करीत म्हणाले, त्याचे ते हातवारे पाहून त्या मुलाला वाटलें कीं, आता आपल्याला हे मारतात कीं काय ? आणि म्हणून तो पळू लागला. आणि तात्यादेखील आपले एकदम त्याचा पाठलाग करूं लागले. मग मनोवृत्तीची इतकी तीव्रता आणि इतका ताजेपणा त्याच्यात कोठून आला होता कोण जाणे.

तो सापडेना तेंव्हा ते आपल्या मुलाजवळ गेले आणि म्हणाले, " कोण, कोण हा मुलगा आलाय ? "

" का ? बंड्या नाव त्याचें. हिचा भाचा. "

" बंडू ! असेल भाचा ! पण मला का उगीच त्रास देतो म्हाताऱ्या माणसाला ? खोलींत नासधूस करतो, बत्ता पळवलान्, स्वस्थपणा म्हणून देत नाहीं. " तात्या हातवारे करीत म्हणाले. त्याना राग आला होता. त्या मुलाचें पारिपत्य त्याना करायचें होतें. काहीं तरी ठळकसें करायचें होतें. आणि दुसरें करण्यासारखें काय होतें ?

त्यांच्या मुलानें आपल्या बायकोला बोलावलें आणि म्हटलें, " त्या मुलाला आवरत का नाहींस तूं ? तात्याना त्रास होतोय् त्याचा. "

सूनबाई नवऱ्याच्या शर्टची कॉलर सारखी करीत म्हणाली, " इश्श, त्रास कसला आलाय् ? लहान मुलें दांडगाई करायचींच. मनावर का घ्यायचें तें मोठया माणसानीं ? आणि तो चार दिवस पाहुणा आला आहे. त्याला ओरडूं वाटतें मी ? "

'बरें, बरें. पण त्याला तात्याच्या खोलींत जायला देऊं नको. तुला तात्याची किंमतच वाटत नाहीं."

"हो. आणि माझी तरी कोणाला वाटते आहे!" सूनबाई फण-काऱ्यानें म्हणाली.

"तसें नव्हे ग..."

अगदीं कान देऊन तात्या हें संभाषण ऐकत होते. त्यांना मौज वाटत होती. त्याच्याविषयीं लोक बोलत होते—त्याच्याबाबत भांडण चाललें होतें. "मी.. मी " उगीचच त्यांनीं खोलींत जोरानें फेरी मारली "एकंदरींत मौज आहे झालें," असा त्याचा आविर्भाव होता.

त्यानंतर तात्याचे दिवस मौजेनें चालले होते. त्याना जी एक भीति वाटत असे ती आता वाटेनाशी झाली होती. दिवस चटकन् जात असे. झोंप अगदीं गाढ लागत असे. हल्लीं आपण हातावर हात चोळत नाहीं, दाढी ओरबाडत नाहीं असे एक दिवस अचानक त्याच्या ध्यानांत आलें आणि त्याना आश्चर्य वाटलें. मौजदेखील वाटली. उगीचच त्यांनीं आपली दाढी ओरबाडून पाहिली. पण मग मात्र ते एकदम दचकले.

दुपारीं पुष्कळदा ते काल्पनिक घोंडोपंताशीं गोष्टी करीत असत. जुन्या आठवणी काढण्यात त्याना आता परत मौज वाटूं लागली होती. आणि एकदा तर शेजारच्या ब्लॉकमध्यें जाऊन उगीचच पाच मिनिटें बसून ते आले होते. ( पण तें त्यांना काहीं जमलें नव्हतें. )

त्रास होता तो त्या बंडूचा. कुठें कसल्या तरी गोष्टी साग, नाहीं तर तात्याना गोष्टी सागायला लाव, कधीं त्याना वेडाव, तर कधीं त्याच्या वस्तु पळव असे सारखे त्याचे उद्योग चालू असत. तात्या कावून जात—अगदीं प्रमाणाबाहेर ( आणि त्यांतच मौज होती. )

ते सारखी आपल्या मुलाकडे जाऊन तक्रार करीत. मुलाचे आणि सुनेचे खटके उडत. तात्या उगीचच जोरानें खोलींत फेऱ्या घालीत.

एक दिवस तर बंडूनें कमाल केली. तो तात्याच्याजवळ आला आणि त्याच्या हातांतील चंची हिसकून घेत म्हणाला, "चला आपण पावसात जाऊन भिजूं या."

तात्यानीं त्याच्याकडे आश्चर्यानें पाहिलें आणि मग जोरानें हातवारे करीत ते म्हणाले, "नको, नाहीं, नाहीं."

बंडू त्याना वेडावीत म्हणाला, "नको, नाहीं, नाहीं." मग त्यानें त्यांची शेंडी ओढली. तो म्हणाला, "चला, चला."

तात्या मुकाटयानें त्याच्या मागून गेले. त्याना राग आला होता कीं भीति वाटत होती कीं आणखी काहीं वाटत होतें काय जाणे. मला वाटतें त्याना काहींच वाटत नसावें. ते मुकाटयानें त्याच्याबरोबर पावसात गेले.

थोडा वेळ ते हतबुद्धपणें पावसात उभे होते. पण मग बंडू त्याचे हात ओढीत म्हणाला, "ओ हो! किती मौज, किती मौज!" नाइलाजानें तात्या त्याच्याबरोबर इकडे तिकडे हिंडूं लागले. इतक्यात पागोळीचा एक मोठा थेंब त्याच्या नाकावर पडला. त्यानीं दचकून वर पाहिलें, तों दुसरा एक थेंब त्याच्या तोंडात पडला आणि तिसरा पडला तो थेट डोळयावर!

तात्या दचकले आणि त्याना एकदम हंसूं आलें. मागें एकदा त्याची बायको धपकन् पडली होती तेव्हाच काय तें त्याना इतकें मजेदार हंसूं आलें होतें.

एखादी मोठी जाभई येऊन गेल्यावर आराम वाटावा तसा त्यांना आराम वाटला.

त्याना वाटलें "हंसण्यात मौज आहे" आणि ती मौज अनुभविण्या-करिता कीं काय ते बंडूकडे पाहून परत हंसले.

तितक्यात सूनबाई तेथें आली. बंडूला ती ओरडून म्हणाली, "चल पाहूं घरांत. आजारी पडलास म्हणजे!" मग एकदम तिचें तात्यांच्याकडे लक्ष गेलें आणि ती म्हणाली, "अगबाई! तुम्ही!"

तात्या घाबरले. बंडूचा त्याना एकदम राग आला. त्यानें घोटाळा केला होता सगळा. ते घुटमळले. पण तितक्यात सूनबाई घरांत निघून गेली. सासऱ्याशीं तिला भांडायचें नव्हतें, नवरा रागावला असता.

थोड्या वेळानें दोघे घरात आले. अंग पुसल्यावर तात्याना अतिशय ताजें, उल्हसित वाटूं लागलें. ते कुठचेंसें गाणें गुणगुणूं लागले. आणि थोड्या वेळानें मोठ्यानें गाऊं लागले. बंडू खदखदां हसू लागला.

तात्या त्याच्यावर एकदम चिडले. "नाव सांगेन तुझें." ते ओरडले,

बंडू परत हंसला. मग कुठूनशी त्यानें एक आणेली काढली. आणि म्हणाला, " चला आपण खाऊ आणूं. "

मागें एकदा जिन्यात पडल्यापासून तात्या घराच्या बाहेर पडलेच नव्हते. म्हणून ते पहिल्यानें तयार झाले नाहींत. पण बंडूनें त्याची फारच ओढाताण केली आणि शेवटीं एकदम त्यानाच काय वाटलें कोण जाणें ! ते म्हणाले, ' चल. '

आज कित्येक दिवसानीं ते रस्त्यांतून चालत होते. कोणीं धक्का देऊं नये म्हणून किती ते जपत होते. मग मोठया कुशलतेनें त्यानीं रस्ता ओलांडला. किती मौज !

खाऊ घेऊन दोघे मौजेनें परत येत होते. तात्या अगदीं रंगात होते. आपण पूर्वी जात होतों तसे ऑफिसात जात आहों असें त्याना वाटत होतें...अरे बापरे, किती उशीर ! त्याना साडेदहाला हजर व्हायचें होतें. ट्राम शिंची वेळेवर मिळेल तर शपथ. कामाचा तर काय नुसता डोंगर उभा होता. एक माणूस जास्त घेतील तर शपथ. साहेबाला ' इफिशिअन्सी ' दाखवायची आहे ना. संध्याकाळीं परत बाजार आहेच. शिवाय हिच्या मामाकडे निरोप...नको रे रामा. नुसतें काम काम काम...तात्याच्या तोंडा-वर हंसूं उमललें.

मोठ्या उत्साहानें ते रस्ता ओलांडून जात असता एक मोटर जोरानें आली. कोणीसें ओरडलें, ' मेला रे म्हातारा ' आणि त्याच वेळीं कर्कश ब्रेक लागून मोटर थांबली.

त्या आवाजानें तात्या अगदीं भेदरून गेले. छातींत केवढा तरी धसका बसला. कावरेबावरे होऊन ते इकडे तिकडे पाहूं लागले. केवढा मोठा, केवढा विचित्र अनुभव होता हा ! सबंध आयुष्यात असा अनुभव त्याना कधीं आला नव्हता. आणि पाहिल्यादा त्याच्या मनात विचार आला तो हा कीं ' आपल्याला मरायचें नाहीं, आणि जणुं मरायचें नाहीं म्हणून त्यानीं आपला एक हात छातीवर घट्ट धरून ठेवला.

आणि आता त्याच्या ध्यानांत आलें कीं, गिरणींत फिरतें तसें एक प्रचंड लोखंडी चक्र त्याच्या डोक्यांत नव्हे सर्व शरीरभर भणाणत होतें, मोठी

भीति, मोठा राग, मोठा आनंद, अस्पष्ट विचार सारीं त्या चक्रांत अडकून मोठयानें ओरडत होतीं. पण त्याचा आवाज धडसा ऐकूं येत नव्हता.

भोंवतीं गर्दी जमली. एकदोन माणसें पुढें होऊन उगीच चौकशी करूं लागलीं. बराचसा गोंधळ माजला. रहदारी अडली, मोटारी कर्णे वाजवूं लागल्या, पोलीस आले.

तितक्यात कुठूनसा त्याचा मुलगा आला आणि त्याना घेऊन घरीं गेला.

तात्या थरथर कापत होते. तें चक्र अजून तसेंच भणाणत होतें. ती मनाची स्थिति आनंदाची होती कीं दुःखाची होती तें तात्यांना कळेना. पण ते विलक्षण रीतीनें उत्तेजित झाले होते ह्यात शंका नाहीं. त्याना जगायचें होतें.

घरीं गेल्यावर मुलगा म्हणाला, "हें काय तात्या? बाहेर कशाला गेलात? नीट दिसत नाहीं. ऐकूं येत नाहीं. मोटारीखालीं सापडला असतात म्हणजे!"

तात्या घाबरून गेले. आपल्या बायकोची भीति वाटत असे तशी त्यावेळीं मुलाची भीति वाटली. आणि बंडूचा त्याना विलक्षण राग आला. तो ह्या साऱ्याचें कारण होता. आणि पाठीमागून जोराचा धसका मिळाला म्हणजे मनुष्य जसा हवेंत उडतो तसे त्याच्या तोंडातून शब्द निसटले, "हा, हा, बंडू तुझा. सारखा त्रास देतो. मला पावसात नेलंन्. खालीं घेऊन गेला. ताप आला असता, मेलों असतों. छळवादी कारटा, नाहीं होत आता सहन... ह्या म्हातारवयात. जरा बरें वाटतें आहे हल्लीं. पण ह्याचा छळवाद......" आणि असे किती तरी वेळ ते अस्थिरपणें बडबडत होते.

त्या दिवशीं त्याचा मुलगा सूनबाईला खूप बोलला. सूनबाई मुळूमुळू रडली देखील. आणि मग दुसऱ्या दिवशीं सकाळींच बंडूची घरीं रवानगी झाली.

* * *

दुसऱ्या दिवशीं बंडू तात्याना त्रास द्यायला आला नाहीं. म्हणून सकाळीं त्यांना बरें वाटत होतें. हुषारी वाटत होती. निदान त्याची तशी कल्पना होती.

हळूहळू संध्याकाळ होऊं लागली. कोणी त्रास देईना, कोणी बोलेना, कांहीं घडेना, परत ती विचित्र अस्वस्थता त्यांना वाटूं लागली. रिकामा

दिवस खायला येऊं लागला. त्यांनीं दाढी ओरबाडली, हातावर हात चोळले. ते कसली तरी वाट पहात होते—अगदीं उत्कंठेनें, काहीं तरी होणार होतें—आता—थोड्या वेळानें—छे !

परत त्या विचित्र भीतीनें त्यांच्यावर पंजा उगारला.

कोणीसें त्याना ढोसकलें, "काहीं तरी कर" आणि मग अनिश्चितपणें उठून ते खिडकी उघडूं लागले. त्यानीं जोरानें धक्का मारला तेव्हा कोठें दार कुरकुरत उघडलें. आणि तात्या परत त्या वेगानें धावणाऱ्या जगाकडे शून्य दृष्टीनें पाहूं लागले.

इतक्यात त्याचा मुलगा आला आणि म्हणाला, " तात्या, तुम्हाला अगदीं बरें वाटत असेल नाहीं. पाठवून दिला त्या द्वाड बंडूला. आता अगदीं स्वस्थपणा मिळेल तुम्हाला. "

तात्यांनीं दाढी ओरबाडली, हातावर हात चोळले आणि ते शून्यपणें म्हणाले, " अं, हो, हो. "

मग एकदम त्याना वाटलें कीं, मुलाकडे तक्रार करावी , " काय हा त्रास ! काय हें ! कसे काढायचे दिवस !" पण कशाबद्दल तक्रार करायची हें त्याना कळेना, आणि त्यानीं उगीचच हातवा रे केले.

त्याच्या मुलानें तें पाहिलें नाहीं, आणि आपल्या बापाला आपण सुखी केलें ह्या आनंदात तो निघून गेला.

—वाङ्मयशोभा, ऑगस्ट १९४५

# मीलन ५

बाभुळवाडी स्टेशन जवळ आलें. वसंतानें आतुरतेनें खिडकीबाहेर डोकावून पाहिलें. त्याला आठवलें, कीं गेल्या वेळेला तो असाच डोकावला होता तेव्हा त्याची आई त्याला चांगली ओरडली होती. आणि त्याला हंसूं आलें. आता आई त्याला तसें ओरडेल हें शक्यच नव्हतें. मोठा झाला होता ना तो! चांगला पंधरा वर्षांचा!

दूर गर्द हिरव्या झाडींतून तांबडीं कौलारें डोकावत होतीं आणि बाभुळ-वाडी गांव डोंगराच्या कुशींत कसें अगदीं बिलगून बसलें होतें. गेल्या खेपेलादेखील त्याला नेमकी हीच कल्पना सुचली होती आणि चारपांच वर्षें झालीं तरी ही आठवण आपल्या मनात इतकी ताजी कशी ह्याचें त्याला आश्चर्य वाटलें.

गाडी स्टेशनात येऊन थबकली आणि वसंतानें पांच वर्षांपूर्वीं पाहिलें होतें तसेंच अजून तें स्टेशन होते. तें म्हातारें चिंचेचें झाड अजून तसेंच प्लॅटफॉर्मच्या कडेला उभें होतें. त्याच्याभोंवतीं भिरभिरणारे कावळे आणि पलीकडे घोंगाव-णारे टांगेवाले ह्यांत जणू कोण अधिक आवाज करतो अशी अहमहमिका लागली होती! आणि पान देताना चुन्याचें भांडें खडखडणाऱ्या त्या पानपट्टीवाल्याचें दुकान अजून तसेंच झोकदार आणि चकचकीत दिसत होतें.

तें ओळखीचें दृश्य पाहून वसंताचें मन उल्हसित झालें. कोटाच्या खिशात हात घालून त्यानें मौजेनें पानपट्टीवाल्याच्या आरशात डोकावून पाहिलें; आणि चार वर्षांत आपण चांगलेच उंच झालों आहों ह्याची त्याला एकदम जाणीव झाली. त्याचें लहानपणचें बाळसें जाऊन तो आता कृश झाला होता आणि त्याच्या हनुवटीवर दिसूं लागलेले ते छोटे छोटे केस!

ते कात्रीनें कापावे असें जेव्हा त्याला एका मित्रानें सांगितलें तेव्हा तो दचकला होता.

आणि मग त्याला वाटलें, कीं गोड हंसऱ्या डोळ्याची, शुभ्र झगा घालून परीसारखी दिसणारी आपली मैत्रीण उषासुद्धा अशीच बदलली असेल का? त्याच्या मनानें एकदम निर्णय दिला, "छे! तिनं मुळींच बदलता कामा नये." फार काय, आपणसुद्धा परत लहान व्हावें अशी वेडी कल्पना त्याच्या मनात डोकावून गेली. इतका तो त्या लहानपणाच्या आठवणींना जपत होता.

आणि टांग्यात बसल्यावर गत आठवणींचीं जिवंत चित्रें त्याच्या मनात उभीं राहिलीं.

मावशीच्या घराशेजारील छोट्या पटांगणात मुलांच्या घोळक्यात तो उभा होता. आणि लठ्ठ गोरटेला बाळ त्यांना सांगत होता, कीं "इंग्लंडमधलीं मुलं-देखील विमानं चालवतात." सगळ्या मुलांनीं मान तुकवली, पण वसंत म्हणाला, "साफ खोटं. आपल्यासारखींच असतात तीं मुलं." बाळला राग आला आणि तो म्हणाला, "जसं काहीं इंग्लंड पाहिलंच आहे ह्यानं!" मुलें हंसणार होतीं; पण वसंता म्हणाला, "वा:! म्हणजे मग भूगोलाच्या मास्तरांना जगच हिंडायला हवं!" आणि बोलून जेव्हा भागेना तेव्हा बाळनें वसंताला पाठीमागून हळूच टपली मारली वसंता चिडून म्हणाला, "संभाळून हं." आपल्या ताकदीच्या घमेंडीत बाळ त्याला ढकलून म्हणाला, "काय करशील रे माझं?" आणि वसंतानें एकदम त्याच्या छातींत असा गुद्दा मारला कीं तो कोलमडला. नंतर मात्र बाळनें वसंताला चांगलेंच चोपून काढलें. काहीं झालें तरी तो तीन एक वर्षांनीं मोठा होता. पण दमून गेला तरी वसंता शेवटपर्यंत त्याचा चिकाटीनें प्रतिकार करीत होता. तेवढ्यांत बाळचे वडील घरीं आले आणि त्यांच्या हाकेसरशी सर्व मुलांची पांगापांग झाली.

दुसऱ्या दिवशीं त्या मैदानांत मुलांनीं क्रिकेटचा खेळ चालविला होता. तेथें देखील बाळचीच दादागिरी चालली होती. आणि मावशीच्या शशीची बॅट नसती तर वसंताचा त्या खेळात शिरकावच झाला नसता. तरी बाळ त्याला

डिवचत होता. आणि मधूनमधून लहानलहान दगड त्याच्या अंगावर येऊन पडत होते.

त्या छोटया पटांगणाच्या एका कोपऱ्यात उषा आपल्या दोनतीन मैत्रिणींना घेऊन ठिकरीचा खेळ खेळत होती. बाळ उगीचच त्यांना गुरकावून म्हणाला, "चला चालत्या व्हा इथून." उषा त्याच्यासमोर उभी राहून आपले टपोरे डोळे त्याच्यावर रोखीत म्हणाली, " तूं कोण आलास मोठा सांगणारा ? तुम्हीच जा इथून ! " त्यानंतर बाळनें त्या मुलींचें चौक पुसून टाकले आणि त्याना असें घाबरवलें की, त्या बिचाऱ्या निघून गेल्या. पण उषा मात्र तशीच तिथें चिकाटीनें उभी होती. बाळनें तिला ढकललें आणि तिच्या पायाला खरचटलें तरी ती तशीच डबडबलेल्या डोळ्यांनीं एका पायरीवर बसून राहिली.

वसंताला वाटलें, कीं बाळनें त्या मुलींशी इतक्या निर्दयपणें वागायला नको होतें पण इतक्यात आधींचा गडी आऊट झाला आणि वसंताची बॅटिंगची पाळी आली. आणि त्याला खेळायला आलेला पाहून बाळ मोठया प्रौढीनें स्वतः बोलिंग टाकायला निघाला. आणि जराशा बेसावध असलेल्या वसंताचा पहिल्या बॉलला कॅच उडाला ! बाळचें तोंड अतिशय फुललें. पण तितक्यात वामननें कॅच सोडला आणि वसंतानें जागच्या जाग्यावर उडी मारली. बाळ चिडून म्हणाला, " अरे, पुढच्या बॉलला घेईन... " पण तो पुढचा बॉल संध्याकाळपर्यंत पडलाच नाहीं ! वसंतानें असे सुंदर फटके मारले, कीं बॉल एकदा कौलावर आणि एकदा थेट बनूताईच्या स्वयंपाकघरात गेला होता ! आणि बिचाऱ्या बाळची टीम संध्याकाळ झाली तरी इनिंग मिळाली नाहीं म्हणून हिरमुसली होऊन जेवायला गेली.

आणि आनंदानें घरीं जात असतां मध्येंच वसंताला अडवून उषा म्हणाली, " छान खोड मोडलीस त्याची ! "

वसंता तिच्याकडे आश्चर्यानें पाहात म्हणाला, " काय ग नाव तुझं ? "

वाऱ्याबरोबर उडणारे आपले केस सावरीत ती म्हणाली, " उषा. "

आणि का कोण जाणे, दोघेंहि एकमेकाकडे पाहून मजेत हंसलीं. आणि मग उडया मारीत घरीं जाताना जेव्हा वसंतानें मागें वळून पाहिलें

तेव्हा उषादेखील त्याच्याकडे वळून पाहात होती. मग रात्रीं तो झोंपला तेव्हा त्याला स्वप्न पडलें कीं, दोन चिमुकल्या पाखरासारखें आपण आणि उषा समोरच्या अगस्त्याच्या झाडावर बसलों आहोंत नी बाळ आपल्या अंगावर दगड मारीत आहे.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं शेकोटीच्याभोंवतीं जेव्हा तो गुडघ्याभोंवतीं हात आवळून बसला होता, तेव्हा उषा तिकडून उड्या मारीत आली आणि त्याच्या शेजारीं बसली. वसंता शेकोटीच्या उबेनें खुशींत येऊन म्हणाला, " मला वाटतं कीं, नेहमीं अशीच पहाट असावी आणि शेकोटीजवळ सारखं बसून राहावं. आणि आईनं आघोळीला मुळीसुद्धा बोलावूं नये. "

आणि उषा त्याच्याकडे बघत म्हणाली, " मलासुद्धा. "

वसंतानें समाधानानें तिच्याकडे बघितलें आणि आपल्या मनातले नाजुक विचार हिला कळूं शकतात ह्या जाणिवेनें त्याला तिच्याविषयीं एक विशिष्ट मृदु भाव वाटूं लागला.

त्यानंतरचे पंधरा दिवस पाखरासारखे भुर्रदिशीं उडून गेले. मुलाच्याबरोबर खेळून उरलेला वेळ वसंत बहुधा उषेबरोबरच घालवीत असे. आणि तेवढ्या दिवसात तिनें त्याला त्याच्या बागेंतील पोपटाचीं पिल्लें दाखविलीं होतीं, आपण जमविलेला सुंदर चित्राचा आल्बम दाखविला होता आणि ' कोणाला सागूं नको हं ' असें बजावून त्याला आपल्याजवळची एक सुंदर डायरी-देखील दिली होती.

तो असा आठवणींच्या तंद्रींत असता टांगा मावशीच्या घरासमोर येऊन उभा राहिला. पण तें घर त्याला चटकन् ओळखलें नाहीं, इतका त्या आसपासच्या भागात फरक झाला होता. मग त्यानें उषेच्या घराकडे पाहिलें तों उषा तेथें दिसली नाहीं ! पण एक पातळ नेसलेली तरुण मुलगी दारात उभी होती; आणि त्यांचा टांगा तेथें उभा राहिला तशी ती घरात निघून गेली.

वसंताच्या मनात अधिरा विचार आला, उषा कुठें असेल बरें ? आणि मावशीच्या घरात जाऊन कपडे काढतो असता त्याच्या एकदम ध्यानात आलें कीं, ती तरुण मुलगी म्हणजेच उषा. आणि क्षणभर त्याच्या हृदयाचें स्पंदन थांबल्यासारखें झालें. त्याच्या मनांतले सगळे गोड विचार एकदम थिजले. छे, ही ती उषा नव्हती ! हिच्याशीं आपण मनमोकळेपणानें बोलणार तरी

कसें? आणि मग मावशीच्या शशीशीं उत्साहानें गप्पा मारणें त्याला अशक्य झालें.

संध्याकाळीं उषा मावशीकडे आली. वसंतानें तिच्याकडे निरखून पाहिलें. ओहो! ती आता चांगली मोठी बाईच झाली होती कीं! पोरकट उषेचा अंशदेखील तिच्यात उरला नव्हता! ती घरात जाऊन मावशीजवळ एखाद्या मोठ्या बाईसारखी बसली. मोठ्या बायकांच्या बोलण्यात येतात त्याच विषयावर ती बोलत होती आणि मग सर्वांत आश्चर्य म्हणजे वसंताची आई उषेला म्हणाली, "काय उषाताई, अण्णा आता छानदार नवरा शोधीत असतील तुम्हाला?"

त्यावर ती लाजून हंसली व म्हणाली, "इश्श!"

वसंताला कळेना कीं अशी काय जादूची कांडी ह्या उषेवरून फिरली आहे कीं हिला सर्वांनीं मोठी बाई समजावें? कसल्यातरी जिज्ञासेनें तो उठला आणि त्यानें आरशात पाहिलें. छे, त्याला कोणीच मोठें म्हटलें नसतें!

आणि ह्या सर्व संभाषणात उषेनें वसंताचा उल्लेखदेखील केला नाहीं ह्याचा त्याला मोठा राग आला. त्याला वाटलें कीं, आपली आई म्हणते तेंच खरें. आपल्याला अतिविचार करायची सवय आहे आणि आपले हे सर्व विचार मूर्खपणाचे आहेत. उषा आपल्याला विसरूनदेखील गेली आहे.

आणि मग बाहेर जाऊन तो शशीशीं गप्पा मारीत बसला. ते दोघे पायरीवर बसले असता एक उंच लठ्ठ गोरटेला मुलगा आला. त्यानें आपल्या केसाचा सुंदर भाग काढला होता. आणि त्याची चालायची पद्धत त्याच्या चाळींतल्या त्या रुबाबदार तरुणासारखी होती. शशीच्या शेजारीं बसून तो बोलूं लागला तेव्हा इतका वेळ वाटणारी शंका खरी ठरली. तो बाळ होता आणि वसंताच्या पाठीवर हात मारून जेव्हां त्यानें त्याची चौकशी केली तेव्हां वसंताला वाटलें कीं आपल्याहून हा फार मोठा आहे.

पण त्याचे बोलायचे विषय मात्र विचित्र होते. आपले ते नवे मास्तर कुठच्या पोरीला बरोबर घेऊन हिंडतात, गावाबाहेर वडाच्या झाडाखालीं त्यांनीं काय केलें, पलीकडच्या घरातील ती सुंदर बाई आपल्या नवऱ्याचा डोळा चुकवून काय करते, त्याच्या वाड्याच्या मालकाच्या तरुण मुलीला त्यानें कसें खूष केलें होतें आणि ती त्याच्याबरोबर कशी फिरायला येणार

होती इत्यादि गोष्टी त्यानें शशीला अगदीं खुलवून सांगितल्या. वसंताला त्या गोष्टी ऐकून काहींतरी विचित्र वाटलें. नंतर त्याच्या मनाला विशिष्ट चोरट्या गुदगुल्याहि होऊं लागल्या आणि शेवटीं त्याला त्या गोष्टींची शिसारी आली तरी त्या गोष्टी ऐकण्याचा मोह त्याला सोडवेना.

तेवढ्यात उषा घरातून बाहेर आली आणि बाळनें आपलें बोलणें एकदम थांबविलें. मग उषा पायऱ्या उतरून जाऊं लागली तशी तो हंसून म्हणाला, " ए उषा, तुझा रुमाल पडला बघ. "

उषा एकदम मागें बघून म्हणाली, " कुठं आहे रे ? "

बाळ नुसता मिस्किलपणानें हंसला. " अग, तुझ्या मैत्रिणीचा निरोप सागायचा आहे. तिनं तुला आपल्या घरीं बोलावलं आहे उद्या दुपारीं, 'चोरटीं चुंबन' पुस्तक घेऊन."

उषेनें त्याच्याकडे मोठे डोळे करून म्हटलें, "चल चावट आहेस तूं !" नी मग तिच्या ओठातून अस्फुट हास्य निसटलें असें वसंताला वाटलें. नंतर तिनें वसंताकडे पाहिलें. तिला काहीं तरी बोलायचें होतें. पण बावरून गेलेल्या वसंताच्या चेहऱ्यावर अगदींच अनोळखी भाव तिला दिसला. त्यामुळें तिचें बोलणें तोंडातच विरलें. आणि त्याच्याकडे बघून हंसावें कीं हंसूं नये ह्या गोंधळातच ती तेथून निघून गेली.

बाळनें हंसून शशीला डिवचलें आणि तो म्हणाला, " कशी गंमत केली ! " नंतर वसंताकडे बघून तो म्हणाला, " अरे बावळटा, तिला तुझ्याशीं बोलायचं होतं. इतकी सुंदर पोरगी बोलायला आली तर असं अजागळासारखं स्वस्थ का बसायचं ? भटजी कुठला ! " आणि तो छद्मी-पणानें हंसला.

वसंताच्या मनात निरनिराळ्या भावनाची धादल उडाली. खरेंच का उषेला आपल्याशीं बोलायचें होतें ? आणि ह्या विचारानें त्याला थोडेंसें समाधान वाटलें. नंतर त्याला वाटलें कीं, आपण खरोखरच बावळट आहोंत. बाळसारखें धीटपणानें आणि मजेदारपणें वागणें आपल्याला जमणारच नाहीं. मग त्याला आठवलें कीं, लहानपणीं बाळनें आपल्याला असेंच काहीं म्हटलें होतें तेव्हा आपण त्याच्या छातींत गुद्दा मारला होता. आणि आता आपल्यातील ती विरोधी शक्ति कुठें गेली ह्याचें त्याला आश्चर्य वाटलें !

नंतर बाळ म्हणाला, " ते गोगटे मास्तर आहेत ना ? ते ह्या पोरीवर खूष आहेत. अगदीं झकास आहे बुवा पोरगी ! "

आणि वसंताला वाटलें कीं, प्रत्येक माणसाकडे ह्या विचित्र दृष्टिकोनानें बाळ का बघतो ? हातानें दगड मारायचे सोडून तोंडानें दगड मारायची ह्याला संवय झाली आहे कीं काय कोण जाणे !

नंतर दोनतीनदा उषा त्याच्याकडे आली, आणि एकदा तर तिनें त्याच्याकडे रोखूनदेखील बघितलें. पण वसंताला वाटलें, छे, आपल्याशीं बोलायची तिला इच्छा व्हावी असें आपल्यात काय आहे ? बाळसारखें चमकदार संभाषण थोडेंच आपल्याला करता येतें ? आणि त्यानें निराशेनें मान फिरविली.

नंतर एक दिवस तो बाळबरोबर फिरायला गेला होता तेव्हा उषा फिरून परतताना त्याला भेटली बाळनें तिला आपल्या आकर्षक बोलण्यानें इतकें मोहित केलें कीं, ती सारखी हंसत होती. त्या दोघाबरोबर एकाकी मुक्यानें चालताना त्याचें मन उदासीनता आणि असूया यानीं भरून गेलें. आणि घराकडे वळताना त्याचा त्यानें निरोपदेखील त्यानें घेतला नाहीं.

आणि नंतर दुपारच्या वेळेला भक् भक् आवाज करीत आगगाडीनें जेव्हा बाभुळवाडी स्टेशन सोडलें तेव्हा त्याभोंवतीं त्याच्या मनानें निर्माण केलेलें आकर्षक वलय नष्ट झाल्यासारखें त्याला वाटलें. व्यथित अंतःकरणानें तो अस्पष्ट उद्गारला, " उषा, उषा ! " आणि त्या सरळ मनाच्या मुलाच्या डोळ्यातून दोन अश्रू ठिबकले.

मुंबईला आल्यावर स्वतःच्या क्षुद्रतेची जाणीव त्याला अधिकच होऊं लागली. लहानलहान प्रसंगानीं खिन्न होण्याची संवय त्याला लागली. पूर्वींचा रगेलपणा आणि हट्टीपणा नाहींसा झाला, आणि पूर्वी ज्या गोष्टी तो सहज करीत असे त्या तो आता घाबरत आणि चाचरत करूं लागला.

इतके दिवस काहीं अभ्यास न करता परिक्षेला बसून वसंता सहज पास होत असे. पण आता त्याला परिक्षेची भयंकर भीति वाटूं लागली आणि मॅट्रिकला त्यानें असा वेड्यासारखा अभ्यास केला कीं, शेवटीं पुस्तक वाचूं लागल्यावर त्यातील शब्दाचा अर्थ त्याला कळेनासा झाला. तो मॅट्रिक पास झाला; पण शाळेंतदेखील त्याचा नंबर पाचाच्या आत आला नाहीं.

आणि कॉलेजच्या रंगीबेरंगी जगात, तेथील मोठाल्या वर्गांत आणि सदा गुर्मीत असलेल्या प्रोफेसरापुढें त्याला आपण अधिकच क्षुद्र आहोंत असें वाटूं लागलें. परत त्या विचित्र भीतीनें त्यानें टर्मिनलला देखील खूर अभ्यास केला. पण टाइम टेबल बघण्यात चूक झाल्यामुळें त्याच्या हातात पेपर आला तो अगदीं कच्चा राहिलेल्या विषयाचा. मध्यें येणाऱ्या रविवारीं वाचण्याकरिता त्यानें तो ठेवला होता. आणि अति अभ्यासामुळें त्याच्या स्मरणशक्तीला जो एक दुबळेपणा आला होता त्यानें त्याला अधिकच दगा दिला. शेवटीं त्या पेपरात त्याला शक्य तितके मुद्दे आठवून उत्तराची स्वतंत्र मांडणी करावी लागली.

परिक्षेचा रिझल्ट लागला तेव्हा इतर विषयात तर त्याला चांगले मार्क मिळालेच; पण त्या पेपरांत त्याला नेमके 'सेकंड हायेस्ट' मार्क मिळाले. आणि प्रोफेसरानीं जेव्हा त्याचें नाव घेऊन त्याला उभें राहायला सांगितलें तेव्हा साऱ्या वर्गाची (आणि त्या चिवचिवणाऱ्या मुलींची देखील) नजर त्याच्याकडे वळली. आणि आपण अगदींच क्षुद्र नाहीं ह्याच्या प्रत्ययानें त्याच्या मनाला विलक्षण उल्हास वाटला.

त्यानंतर वसंताला स्वतःविषयीं एक प्रकारचा विश्वास वाटूं लागला. आणि वेड्यासारखा अभ्यास करण्याचें त्यानें सोडून दिलें. उलट अनुभवानें आणि विचारानें कुठल्याहि विषयाची पकड घेण्याचें स्वतःचें असें स्वतंत्र तंत्रच त्यानें निर्माण केलें.

वार्षिक परिक्षेला तो बसला तो एका विशिष्ट ईर्ष्येनें. आणि नंतर त्यानें बोर्डावर जेव्हा रिझल्ट पाहिला—छे, पाहिला कसला ? तो गेल्यावर 'फर्स्ट क्लास' म्हणून त्याच्या मित्रानीं त्याला डोक्यावर घेतलें ! आणि मित्राना चहा दिल्यानंतर पाकिटातले पैसे मोठया अभिमानानें हराण्याला देताना त्याला वाटलें कीं, हें ऐकून लहानपणीं हंसली होती तशी उषा मधुर हंसेल.

त्यानें आपलें मन आवरलें. असले मूर्खपणाचे विचार सोडून द्यायचे असें त्यानें ठरवलें नव्हतें काय ? निग्रहानें त्यानें ते विचार दूर सारले आणि भराभर प्रगतीचे टप्पे गाठीत तो पुढें जाऊं लागला.

आतर कॉलेजीय वक्तृत्वाची चढाओढ होती. कॉन्व्होकेशन हॉल

नुसता विद्यार्थ्यांनीं भरून गेला होता, आणि हंशा, टाळ्या, हाका नी गप्पा ह्यानीं तिथें इतका गोंगाट माजून गेला होता कीं शेजारच्या माणसाशीं बोलायचें म्हणजे हाताचा कर्णा करून मोठ्यानें ओरडावें लागे.

वसंत पुढच्या एका खुर्चीवर शांतपणें बसला होता. सभा आणि भाषणें आता त्याच्या अगदीं अंगवळणीं पडलीं होतीं. त्याच्यामागें बसलेला एक ख्रिश्चन मुलगा आपल्या शेजारच्या मुलाला म्हणाला, " बरं तें असो. पण आपल्या कॉलेजचा प्रतिनिधि कोण ? "

" वसंत देशमुख. " शेजारचा मुलगा वसंताकडे बोट दाखवून म्हणाला. वसंताला हंसूं आलें. त्याला वाटलें, बरोबर आहे. हीं निर्बुद्ध मुलें आपल्याला निवडणारच ! आपल्याला बुद्धिमत्ता आहे तर आपण आपलें वर्चस्व का गाजवूं नये ? आणि अशा पुष्कळ विद्यार्थ्यांना आपल्याविषयीं हेवादावा का वाटावा तें त्याला कळेना. मग ती विचारशृंखला तिथेंच सोडून त्यानें घाईघाईनें परत एकदा आपले भाषणाचे कागद चाळले.

त्याचें नाव पुकारलें तेव्हा तो स्टेजवर जाऊन उभा राहिला. पहिल्या दोन वाक्यातील चटकदार उपरोधानें श्रोत्यात हास्याची एक लाट उसळली. वसंताला वाटलें, आपण जिंकली. आणि नंतर वक्तृत्व यशस्वी करण्याकरिता त्यानें योजलेल्या बारीक सारीक योजना जसजशा यशस्वी होऊं लागल्या तसतसा त्याचा उत्साह वाढतच गेला. आणि शेवट तर त्याला इतका सुंदर साधला कीं, सगळ्या हॉलमध्यें टाळ्याचा प्रचंड कडकडाट झाला.

विजयाच्या नशेंत वसंत जाग्यावर जाऊन बसला. आपल्यानंतर बोलायला कोण उठतें तें बघण्याकरिता त्यानें भोंवताली दृष्टि फिरवली. नारिंगी रंगाचें पातळ नेसलेली एक सुंदर मुलगी उठून स्टेजकडे जाऊं लागली. वसंतानें तिच्याकडे पाहिलें आणि तो स्वतःशींच उद्गारला " उषा. " आणि त्याच्या मनातली कुठची तरी सुप्त भावना एकदम फुलारली.

अलीकडे उषेला तो जवळजवळ विसरलाच होता. ती पुण्याच्या कुठल्या तरी कॉलेजात आहे असें त्यानें ऐकलें होतें आणि तिकडे ती देखील आपल्यासारखी चमकत आहे असें कोणींतरी म्हटल्याचें त्याला आठवत होतें. पण त्यानें म्हटलें होतें, सुंदर मुलींना चमकणें फार सोपें असतें.

पण परवा मात्र हँगिंग गार्डनवर फिरत असताना तिथें बागडणाऱ्या एका गोड युरोपियन छोकरीला पाहून त्याला उषेची एकदम उत्कटतेनें आठवण झाली होती. आणि का कोण जाणे, त्याचें मन एकदम खिन्न झालें होतें. त्याच्या कॉलेजातील नाटकात काम करणारी आणि मुलांशीं धीटपणें बोलणारी तारा जोशी त्याला भेटली तरी त्याचा खिन्नपणा नाहींसा झाला नव्हता

उषा शातपणें स्टेजवर जाऊन उभी राहिली. एकवार हातातल्या कागदावरून नजर फिरविली आणि ते टेबलावर ठेवून तिनें आपली पर्स त्यावर ठेवली आणि हॉलमधला गलबला कमी झाल्यावर तिनें हलक्या आवाजात सुरवात केली, " लेडीज् ॲंड जंटलमेन् ! "

वसंताला भीति वाटली कीं हिचा आवाज शेवटपर्यंत जाऊन पोंचतो कीं नाहीं कोण जाणे ! पण तिसऱ्याच वाक्यात तिचा आवाज पूर्ण उंचीला चढला आणि तिच्या गोड नी स्पष्ट आवाजानें सगळा हॉल भरून गेल्यासारखें त्याला वाटलें. तिच्या भाषणात टाळ्याचा कडकडाट अगर हास्याचा स्फोट होत नव्हता, पण मधूनमधून स्मितलहरी हॉलमध्यें खेळत होत्या. वसंताला पाहिल्यानें वाटलें कीं, वक्तृत्व यशस्वी करण्याकरिता योजायच्या युक्त्या हिला बहुधा माहीत नसाव्या. पण थोड्याच वेळात त्याच्या ध्यानात आलें कीं, त्या तिला पुरेपूर माहीत आहेत, आणि त्याचा संयमपूर्वक उपयोग करण्याची संवय तिनें स्वतःला लावून घेतली आहे; आणि भाषण यशस्वी करण्यापेक्षां आपलें म्हणणें लोकाना कळेल, पटेल नी त्याच्या मनावर ठसेल अशा प्रकारें सागण्याकडेच तिची प्रवृत्ति आहे.

तिचें भाषण संपलें तेव्हा वसंतानें मनःपूर्वक टाळ्या वाजवल्या. आणि इतर लोक टाळ्या वाजवायचे थाबले तरी तो टाळ्या वाजवतिच होता. आपल्या जागेकडे जाताना उषेनें वसंताकडे पाहून गोड हास्य केलें. मागून एक मुलगा ओरडला, " आहे ब्बुवा ! "

सभा संपल्यावर उषेला भेटायचें असा वसंतानें निश्चय केला. पण त्याला पहिलें बक्षीस मिळाल्याचें जाहीर झालें आणि मित्राच्या गप्पागोष्टींत आणि ओढाताणींत तिच्याकडे जायलाच काय पण बघायलाहि त्याला फुरसत झाली नाहीं. पण राहून राहून त्याला वाटत होतें कीं, उषेलाच पहिलें बक्षीस मिळायला पाहिजे होतें; पण हे परीक्षक पुष्कळ वेळां अशाच चुका करतात.

हॉलमधून तो बाहेर पडला तों त्याला बाळ दिसला. तो आतां चांगलाच लठ्ठ झाला होता. त्याच्या अंगावर उंची कपडे होते, तोंड पानपट्टीनें रंगलें होतें आणि हातात सिगारेट पेटत होती. वसंताचें त्यानें अभिनंदन केलें. वसंता त्याला म्हणाला, "काय रे, यंदा सीनिअरला असशील ?" बाळ हंसत म्हणाला, "छे रे, इंटरला गचकलों दोनदा ! इतर धंदे करून वेळ उरेल तेव्हा आम्ही अभ्यास करणार." तो खी खी करून हंसला. त्याच्याबरोबरचे समानधर्मी मित्रहि खिंकाळले.

संध्याकाळीं वसंता जेव्हा आरामखुर्चीत पडला होता तेव्हा उषेविषयींच्या विचारानीं त्याच्या मनाला एखाद्या दुलदुलीत दुलईसारखें गुरफटून टाकलें होतें. त्या गोड तंद्रींत असता बाहेरून कुठचातरी ओळखीचा स्वर कानावर आल्यासारखें त्याला वाटलें आणि नंतर त्यानें ओळखलें कीं, तो आवाज उषेचा होता. एखादी सम्राज्ञी आल्यावर मधुर संगीत सुरू व्हावें आणि मानकन्याची धादल उडावी तशी त्याच्या मनाची स्थिति झाली.

त्यानें उठून एकवार आरशात पाहिलें. आता तो पुरा उंच झाला होता. आणि त्याची रुंद छाती आरशात मोठी डौलदार दिसत होती. त्याला कोणी सुंदर म्हटलें नसतें; पण तो तरतरीत खास होता. त्यानें उगाच एकदां केसावरून हात फिरवला व काहींशा विमनस्कतेनें तो खालीं बसला. कधीं एकदा ह्या आईचें उषेबरोबरचें बोलणें संपतें असें त्याला झालें.

शेवटीं पुष्कळ वेळानें एकदा तें बोलणें सपलें आणि उषा त्याच्या खोलींत आली. त्याला वाटलें कीं, अमृतकलश घेतलेली मोहिनीच आपल्या-समोर उभी आहे.

तिनें त्याचें अभिनंदन केलें आणि प्रेमळपणें चौकशी केली. आणि त्याच्या ध्यानात आलें कीं, आपल्याविषयींची बरीच माहिती हिनें आस्थापूर्वक गोळा केली आहे.

त्यामुळें त्याला मोठा उत्साह वाटला. आणि उषेला जिंकण्याचा जबरदस्त प्रयत्न करण्याचें त्यानें ठरविलें. कॉलेजमधल्या मुलींशीं बोलतांना जी एक विशिष्ट लकब यशस्वी ठरली होती त्याच लकबीनें तो तिच्याशीं बोलूं लागला. पण कां कोण जाणे, काहीतरी नी कुठेंतरी खटकत होतें. तो जीं चटकदार मतें सागत होता तीं तिला पटत नव्हतीं, त्याचा विनोद तिला

मानवत नव्हता. आणि किंचित् अश्लीलतेची झाक असलेली एक गोष्ट जेव्हा त्यानें तिला सफाईदारपणें सांगितली तेव्हा नापसंतीची छटा तिच्या चेहऱ्यावरून झरकन् सरकून गेली. जणूं तिला म्हणायचें होतें, " मीं तुझ्या-पासून असल्या गोष्टींची अपेक्षा केली नव्हती. " पण विजयाला सरावलेल्या वसंताच्या लक्षात ह्या गोष्टी आल्या नाहींत, इतका तो आपल्या बोलण्यात रगून गेला होता. शेवटीं तो तसाच उत्सा-हानें बोलत असता ती उठून हलकेंच म्हणाली, " बरं, मीं आता जातें. उशीर होईल मला. " आणि वसंताकडे एकदा हंसून बघून ती जाऊं लागली.

काय झालें तें वसंताच्या एकदम ध्यानात आलें. त्याचें तंत्र, त्याची लकब ह्याचा पराजय झाला होता. त्याच्यामधला जो एक विशिष्ट दुवा तुटला गेला होता तो त्याला परत साधता आला नव्हता. त्याच्या पहिल्या भेटींत परस्पराकडे पाहून त्यानीं जें हास्य केलें होतें तसें हास्य त्यानीं ह्या वेळीं केलें नव्हतें. कॉलेजात आल्यापासून आपण जें कमावलें तें ह्या मुलीला आकर्षू शकत नाहीं ह्याचे त्याला आश्चर्य वाटलें. आणि ह्याहून देण्यासारखें दुसरें आपल्याजवळ आहे तरी काय ह्याचा त्याला प्रश्न पडला. एक प्रका-रची मनस्वी असहायता त्याला वाटूं लागली. आणि उषा बाहेर पडणार इतक्यात त्याच्या तोंडून हाक निसटली, " उषा. " नंतर त्याला वाटलें, छे! काय वेड्यासारखें केलें आपण हे ? त्यानें एकवार साशंक मुद्रेनें उषेकडे पाहिलें आणि मग काय करावें हें न कळल्यामुळें तो खिडकीबाहेर पाहूं लागला.

उषा दारांत थबकली आणि क्षणभर तिनें वसंताकडे टक लावून पाहिलें आणि मग ती मंद गतीनें त्याच्याजवळ जाऊन उभी राहिली. वसंताला वाटलें, ती आता विचारील "काय ?" पण नुसती स्तब्ध उभी राहून त्याच्या सारखीच ती खिडकीबाहेर पाहात होती. सभोवार वेडींवाकडीं पसरलेलीं बेढब छपरें सायंकाळच्या सुवर्णप्रकाशानें न्हाऊन निघाल्यामुळें सुबक दिसत होतीं. आणि मध्येंच डोकावणाऱ्या गिरणीच्या एकाद्या धुराड्यातून धुराची वक्र रेषा रेंगाळत दूरवर चालली होती.

त्या दोघाची स्तब्धता परस्पराना अस्वस्थ करीत नव्हती. उलट दोघें एक प्रकारच्या ध्यात मनःस्थितींत बाहेर बघत होतीं. वसंत सहज म्हणाला,

"हें धुराडं पाहून मला लहानपणीं वाटायचं कीं, कोणी तरी अगडबंब साहेब भला मोठा चिरूट ओढतो आहे. तुला ग ?"

उषेला हंसूं आलें. ती कुठच्या तरी आठवणीनं म्हणाली, "मला पण."

तिला वाटलें कीं विचित्र कल्पना करणारा, सरळ मनाचा आणि उमदा छोटा वसंत आपल्याला परत सापडला आणि ती कौतुकानें त्याच्याकडे पाहूं लागली. त्याच्या शर्टची दुमडलेली कॉलर सारखी करून त्याला नीटनेटके-पणाचा धडा द्यावा असें तिला वाटलें आणि आपल्या कुरळ्या केसाचा भांग निष्काळजीपणें विसकटून टाकल्याबद्दल त्याच्यावर रागावणेंच योग्य आहे असें तिच्या मनानें ठरवलें.

वसंतानें तिच्याकडे पाहिलें आणि इतका वेळ जो प्रश्न विचारायचा त्याला धीर झाला नव्हता तो त्यानें हलक्या आवाजात विचारला, "उषा, मी तुला आता आवडत नाहीं का ग ?"

उषेनें आपल्या नखाग्राकडे उगीचच नजर फिरविली आणि मजेदारपणें मान हालवली. जणूं तिला म्हणायचें होतें, "किती हा वेडा प्रश्न !" तिच्या मोहक केशरचनेवर होणारा सूर्यप्रकाशाचा खेळ अधिक मनोहर, कीं तिच्या गोड मुखावरचा भावनाचा संभ्रम अधिक आकर्षक हें कोडें वसंताला पडलें आणि त्यानें हलकेंच तिचा हात पकडला.

इतक्यात कपबशा वाजल्याचा आवाज झाला आणि आई म्हणाली, "चहा आणला आहे हं." आणि चोरून खाऊ खाताना पकडल्या गेलेल्या लबाड मुलासारखीं त्या दोघांचीं अंगें थरारलीं.

—किर्लोस्कर, मे १९४४

## कशी झाली गंमत !  ६

स्वयंपाकघरात बसून मी वाटीच्या तळानें डोंगळे मारीत होतों. आई निखारे सारखे करीत होती.

आई बारीक आहे. ती खूप हंसते आणि पटकन् रडते, तिचे डोळे चित्रातल्या बाईच्या डोळ्यासारखे आहेत. मी तिच्याजवळ खाऊ मागणार होतों...

तितक्यात समोरच्या इमारतीमधल्या फोनोचा एकदम आवाज आला—

" सो ऽजा राजकुमारीऽ. "

आई निखारे खडबडवायची थांबली आणि खिडकीजवळ जाऊन ऐकत उभी राहिली.

आईला गाणें फार आवडतें. म्हणून बाबा तिच्यावर रागावतात. म्हणून मी पण मोठ्यानें त्या गाण्याला वेडावलें.

" ऐक रे गोंदू ! " आई म्हणाली. ती रागावली तरी हळू बोलते. मी तिला मुळींच भीत नाहीं.

परत मीं वेडावलें—आणि पुन्हा एकदां. तशी आईनें मला चापटी मारली. ती जोरानें मारीत नाहीं—तिला तसें मारताच येत नाहीं.

" का मला मारलंस ? " मी ओरडलों आणि मग मोठ्यानें रडायला लागलों.

आई एकदम भिऊन म्हणाली, " चिप, रडूं नको एवढ्या मोठ्यानं. "

पण मी तसाच रडत राहिलों. बाबा होते ना बाहेर !

" काय शिंचा त्रास आहे ! " असें मोठ्यानें ओरडत बाबा घरांत आले.

त्याचें पोट मोठें आहे आणि मिशा पण! रागावले म्हणजे ते मिशानींच बोलतात.

मी मोठ्यानें म्हटलें, "मारलंन् मला."

आई बाबाना घाबरते. ती घाबरत म्हणाली, "जरा गाणं ऐकत होतें तर ऐकूं देईना, म्हणून .."

"बरं. बरं. स्वयंपाकाच्या वेळीं गाणीन् बिणीं कशाला हवीं? कसल्या एकएक हौशी तुझ्या!" बाबानीं डोळे खूप मोठे केले आणि ते बाहेर गेले.

आई गप्प बसली. तिनें डोळ्याना पदर लावला आणि तिचें नाक लाल झालें.

मग कशाला मारलेंन् तिनें मला?

मला खाऊ हवा होता. म्हणून मी तसाच रडत राहिलों. असें रडत राहिलें म्हणजे बाबा बाहेरून ओरडतात, "गप्प नाहीं का करायचा त्याला?" आणि मग खाऊ मिळतो! आईची आणखी फजिती होते.

पण त्या दिवशीं बाबानीं तसें केलें नाहीं त्यानीं मलाच जोरात टपली मारली आणि म्हणाले, "चल हो चालता बाहेर."

बाबा फार जोरानें मारतात. त्यानीं मारल्यावर रडलें तर आणखी मार मिळतो म्हणून मीं पळून गेलों.

विश्वासला कोणीं मारलें तर त्याला खूप राग येतो आणि तो रडतो. आम्हांला नाहीं बुवा राग येत! तो मला कोडगा म्हणतो मग मी त्याला शिष्ट म्हणतों आणि त्याच्या अंगावर थुंकतों.

सान्याची चिमी गॅलरींत खेळत होती. मी तिला मोठ्यानें चिमटा काढला आणि खालीं पळालों. ती खूप मोठ्यानें किंचाळली पण तिला अजून बोलताच येत नाहीं. मग कसें सांगेल ती माझें नाव?

संध्याकाळ झाली होती. गणपतीच्या आरतीची वेळ झाली तेव्हा मी मोठी घंटा घेतली आणि सारखी वाजवीत वाडीभर हिंडलों. मी घंटा खूप वेळ वाजवतों, आणि खूप मोठ्यानें—मग लोक असे रागावतात माझ्यावर! पण मला कोणीच काहीं करीत नाहीं. माझ्या बाबाशीं भांडायला सगळे घाबरतात.

मीं दामूला आणि मधूला बरोबर घेतलें. ते दोघे मला घाबरतात आणि माझें ऐकतात.

वाटेंत कुंस्याकडचे म्हातारे काका हळुहळू काठी टेकीत टेकींत चालले होते.

मला एकदम गंमत आठवली. मीं मधूला म्हटलें, "चल, आपण त्याच्या कानात घंटा वाजवूं या."

मधू म्हणाला, "नको रे. ते म्हातारे आहेत."

मी रागावून म्हटलें, "आला मोठा दयाळू." आणि मीं हातातला दाडा त्याला मारला. तो त्याच्या कोपरावर बसला. तो रडायला लागला.

मी त्याला वेडावलें.

... खरेंच, पण कोपरावर मारलें म्हणजे फार लागतें, नाहीं ? मास्तरनीं माझ्या एकदा मारलें होतें तेव्हा...

मग आम्ही हळूच जाऊन म्हाताऱ्या काकाच्या कानात जोरानें घंटा वाजवली. तशी ते एकदम घाबरून ओरडले आणि पडले. मला इतकें हंसायला आले म्हणून सागूं !

पण इतक्यात कुंटे आले आणि त्यांनीं माझें आणि दामूचें बकोट धरलें. दामू खूप घाबरला. मी पटकन् सांगितलें, "ह्या दामूनें वाजवली ही घंटा." तशी कुंस्यानीं मला सोडलें आणि दामूला दोन थपडा मारल्या.

मी बघत होतों गंमत ! दामूचें तोंड झालें होतें माकडासारखें लाल. तो म्हणाला, "आपली दोस्ती असून अस करतोस काय ?"

मीं म्हटलें, "दोस्तीबिस्ती कुछ नाहीं." आणि मोठ्यानें हंसलों.

शाळेंत मला मास्तरानीं "ढढ्ढोपंत" म्हटल्यावर सगळे हंसतात तेव्हा ! मागून कोणीसें म्हणालें, "आहेच तसा तो हलकट."

मीं मागें पाहिलें तों विश्वास !... बापरे. छानच गाडी केली होती कीं त्यानें ! दोन दिवस करीत होता तो ती गाडी आणि कचकड्याचा एक छान घोडा पण त्यानें गाडीला जोडला होता.

मी पण तसली गाडी मागें एकदां करीत होतों. किती छान चाकें कापलीं होतीं मीं. पण बाबानीं तें पाहिलें आणि सगळें गटारात फेंकून दिलें ! इतका राग आला मला; पण रडलों तर आणखी मार मिळाला असता.

म्हणून गप्पच राहिलों. पण जानवें इतक्या जोरानें ओढलें कीं, माझ्या मानेला काच लागला.

मग मला एक गंमत आठवली. मी धावत गेलों आणि धपकन् त्या गाडीवर पाय दिला. गाडी मोडली. कचकड्याचा घोडा चेपाटून गेला. मला इतकें हंसायला आलें म्हणून सागूं! मीं म्हटलें "ओ, कशी फजिती केली!"

पाठींत रट्टा मारल्यासारखें विश्वासला झालें. तो नुसता त्या मोडक्या गाडीकडे पाहातच राहिला. मग त्याला रडूं आलें. आणि तो म्हणाला, "ह्यात काय मिळालं रे तुला? दुष्ट!"

मीं म्हटलें, "हलकट का म्हणालास मला?" आणि मग नाकापुढें हात धरून मीं त्याला वेडावलें.

तशी तो माझ्या अंगावर धावून आला आणि त्यानें माझा शर्ट छाती-जवळ पकडला.

मी त्याला घंटेच्या दाड्यानें मारलें. तें त्याला खूप लागलें. पण त्यानें मला सोडलें नाहीं आणि खूप मारलें. मीं पण त्याला मारलें. पण तो खूप ताकदवान आहे. (तो दूध पितो आणि व्यायाम शाळेत जातो.) म्हणून त्यानें मला पाडलें आणि तो माझ्या छातीवर बसला. मग त्यानें दामूला बोलावलें आणि म्हणाला, "मार ह्याच्या तोंडात."

मी एकदम उसळी मारली आणि म्हटलें, "दाम्या याद राखून ठेव!" विश्वासनें मारलें तर चालेल. तो ताकदवान आहे. पण दामू?...

दामू भीत होता; पण शेवटीं त्यानें हळूच माझ्या तोंडात मारली. मला इतका भयंकर राग आला. मी ओरडलों, "हलकट, पाजी, बेशरम"... आणि मी थुंकलों, पुन्हा थुंकलों.

तशी विश्वासनें मला परत खूप मारलें. मग मला गंमत आठवली. मी विश्वासला म्हटलें, ए, नको ए. सोड मला. परत नाहीं मी असं करणार—अगदीं खरं. तशी विश्वासनें मला सोडून दिलें आणि तो आपल्या गाडीजवळ गेला.

मी त्याच्या मागून जाऊन हळूच त्याला टपली मारली आणि जोरानें पळालों. तो मला म्हणाला, "कुत्रा" मीं परत त्याला वेडावलें आणि असा पळालों. नाहींच सापडलों त्याला!

तें काहीं नाहीं. व्यायामशाळेंत जाऊन मला आता खूप शक्तिवान झालें पाहिजे. मग असा मारीन मी विश्वासला, पण बाबा म्हणतात, काहीं नको व्यायामशाळा. आम्हाला आपलें काहीं नाहीं. खाऊ नाहीं, खेळ नाहीं, बक्षीस नाहीं, पैसे नाहींत...

थोड्या वेळानें आरती झाली. प्रसादाला पेढे होते–ओहो पेढे ! मी खूप प्रसाद मागून घेतला. परतदेखील घेणार होतों. पण बाबानीं तें पाहिलें आणि माझ्या तोंडात मारली. सगळ्या लोकाच्यादेखत मारलें. सगळीं मुलें हंसायला लागलीं.

असें झालें मला अगदीं ! वाटलें, कीं गणपतीच्या स्टेजखालीं लपून बसावें. कृष्ण होऊन बाबाना मारावें...घशात रडण्याचा मोठा गोळा आल . पण रडलों असतों तर...

मग मला एक गंमत आठवली. मी सगळयाहून मोठयानें हंसलों. लोक म्हणाले, " आहे खरा कोडगा ! " आणि हंसले. मग मी पण हंसलों.

कशी केली गंमत !

रात्रीं आमच्या वाडींत गाणें होतें. एक छान बाई गायला आली होती. विश्वास म्हणाला, " किती छान दिसते रे ती ! " तशी मीं संडासात लिहिलेलें असतें तसलें घाणेरडें बोललों. तेव्हा सगळीं मुलें हसायला लागलीं. विश्वासची फजिती झाली.

मग मी परत परत तसें बोललों. तशीं मुलें म्हणालीं, " पुरे बुवा ! सारखंसारखं कसलं घाणेरडं बोलतोस ? "

माझे बाबा गाण्याला अगदीं सगळयाच्या पुढें बसले होते. गाणें सुरू झालें तशी ते अगदीं खुर्चीच्या कडेला बसले. आणि ते आधाशी माणसासारखे दिसूं लागले.

त्याच्याकडे पाहून दोन चष्मेवाले लबाड दिसणारे लोक हंसूं लागले. मला कळली त्याची गंमत.

गाणें चागलें होतें. आईच्या कुशींत निजल्यावर जसें मऊमऊ छान वाटतें, तसें गाणें ऐकताना वाटलें. कोणाला टपली मारावी असें नाहीं. एक गाणें संपलें तशी बाबानीं मागें पाहिलें. त्या हंसणाऱ्या लोकाच्याकडे त्यानीं रागानें पाहिलें. तेवढयात मी त्याना दिसलों, तशी त्यानीं मला बोलावलें

आणि ते म्हणाले, " चल चालता हो घरीं. " मी पळालों. नाहीं तर मार मिळाला असता.

मला राग आला. आम्हीं गाणें ऐकायचें नाहीं—काहीं करायचें नाहीं !

मग मला एक गंमत आठवली. तिथंच लपून बसलों आणि गाणें सुरू झालें तसा दरवाजाजवळ गेलों आणि तिथें मोठयानें ओरडलों आणि पळून गेलों. लोक खूप रागावले. एक तर माझ्यामागें धावलादेखील ! पण मी कसला सापडतों त्याला ! हा. हा. हा. कशी जिरवली सगळ्यांची !

घरीं गेलों तेव्हा आई गॅलरींत बसून गाणें ऐकत होती. बाबा रागावतात म्हणून ती मंडपात येत नाहीं. तिच्याजवळ विश्वास बसला होता. त्याची खरी आई देवाकडे गेली. नवी आई त्याला खूप मारते आणि बाहेर जायला देत नाहीं. म्हणून तो गॅलरींतच बसला होता.

पण त्याचे बाबा फार चागले आहेत. ते त्याला खाऊ देतात, खेळ करायला शिकवतात आणि कधींकधीं तर दोन्ही हातानीं उचलून उंच करतात. मलासुद्धा केलें होतें एकदा तसें त्यानीं. इतकी मौज वाटते !

आईनें मला जवळ ओढलें. मी तिचा हात झिडकारणार होतों; पण मला तसें करताच आलें नाहीं. मग मीं विश्वासला म्हटलें, " तूं कशाला माझ्या आईजवळ येतोस ? चल चालता हो. "

तशी आई म्हणाली, " वा, असं नाहीं म्हणायचं ! " आणि तिनें विश्वासला जवळ ओढलें. मला परत आईला झिडकारावें असें वाटलें. पण कधीं-कधीं—संध्याकाळच्या वेळीं आईच्या माडीवर झोपावें; मुळींच उठूं नये असें वाटतें.

विश्वास म्हणाला, " काकू, एक गोष्ट सागा ना. "

आईनें त्याच्याकडे पाहिलें आणि म्हणाली, " सागतें हं " मग आई हंसली आणि तो पण हंसला. दोघाचें काहींतरी गुपित असावें तशीं तीं दोघें हंसलीं.

मग आईनें एक छान गोष्ट सागितली. त्या गोष्टींतला मुलगा किती शहाणा होता. त्याचा कुत्रा त्याचा अगदीं जीवश्चकंठश्च मित्र होता; त्याच्या दुष्ट सावत्र आईनें त्याचा किती छळ केला ! मग तो खूप मोठा झाला, शहाणा झाला. आणि तरी तो सावत्र आईवर ागावला नाहीं !

नको रे बुवा ती सावत्र आई. माझी आई आहे ती छान आहे आणि मग मी आईला एकदम मिठी मारली. आईनें मला थोपटलें.

मग विश्वास म्हणाला, "उद्या भाषणाची चढाओढ आहे. मला भाषण कसं करायचं तें सांगा ना."

"म्हणजे, तुझे बाबा कुठं आहेत ?" आई म्हणाली.

"बाहेरगावीं गेले आहेत. पण ते उद्या माझं भाषण ऐकायला येणार आहेत. ते म्हणाले, "काकूंच्याकडून भाषण लिहून घे."

आई म्हणाली, "खरंच ?" आणि मग ती थोडा वेळ आपली गप्पच बसून राहिली.

आई म्हणाली, "गोंदू, तूं सुद्धा कर कीं भाषण." मी पाय आपटीत म्हटलें "मला नाहीं तसलं येत. आवडत नाहीं मला."

"का नाहीं येत ? येईल कीं."

"मी कुठाय हुश्शार मुलगा ?" आणि मी परत पाय आपटले.

"का बरं ? हुषार नसायला काय झालं ? तुलासुद्धा येईल सगळं."

"खरं ?" मीं विचारलें. काहींतरी सांगत होती आई. बाबा, मास्तर सगळे म्हणतात मला काहीं यायचं नाहीं म्हणून. मी तसला मुलगा नाहींच आहे. मी आहे दांडगा, लबाड मुलगा !

पण आई सारखें सारखें म्हणाली कीं मी चांगला मुलगा आहे; मला सगळें येईल आणि मग मला तें खरेंच वाटायला लागलें.

आई म्हणाली, "मग आण कागद." लिहून काढ भाषण.

मीं म्हटलें, "मीं नाहीं. मला कंटाळा आलाय." पण खरें म्हणजे मला भीति वाटत होती.

मग आई म्हणाली, "मी तुला खाऊ आणून देईन."

मीं म्हटलें, "अगदीं पेढे आणून देशील ?"

आई म्हणाली, "हं"

मी कागद घेऊन आलों आणि म्हटलें, "पण मला बक्षीस नाहीं ग मिळायचं आई. मी नाहीं तसला मुलगा."

आई म्हणाली, "अगदीं नक्की मिळेल पाहा तुला बक्षीस !" आणि मला आपलें तें खरेंच वाटलें.

मग मीं आणि विश्वासनें भाषणें लिहून काढलीं.

दुसऱ्या दिवशीं मी भाषण पाठ करायला लागलो तेव्हा बाबा म्हणाले, "कसलीं भाषणं करतो आहेस ? अभ्यास कर आधीं."

मला पण कंटाळा आला होता. मी आणि दामू भय्याला चुकवून पोपया काढणार होतों.

पण आई खाऊ देणार होती ! आणि खरं सागूं ? मला आईची आणि विश्वासची भीति वाटली, म्हणजे मारतील म्हणून नाहीं हं. मी बस-लोंय सापडायला त्याना ! पण निराळीच वाटली बुवा भीति.

मग मी अगदीं खूप मन लावून भाषण पाठ करायला लागलों आणि मग मला आपली त्यात गंमतच वाटायला लागली. मीं अभ्यास करताना जानव्याशीं खेळतों तसादेखील तेव्हा खेळलों नाहीं.

भाषण पाठ करताना मला खूपखूप वाटलें, कीं आपण अगदीं छान भाषण करायचें, लोकाची शाबासकी घ्यायची, आईचें आवडतें व्हायचें, त्या गोष्टींतल्या शहाण्या मुलासारखें दूर देशाला जाऊन मोठें होऊन यायचें. आणि मग आईला म्हणायचें "आई, आता मी तुला आवडतों ना ?"

माझ्या घशाशीं मोठा गोळा आला. मला कधी असें वाटत नाहीं. पण त्याच दिवशीं वाटलें. आणि मग मीं सदऱ्याचा बोळा करून तोंडात घातला आणि दोन्ही हातानीं तोंड झाकलें

मीं भाषण खूपखूप पाठ केलें. इतकें कीं, माझी पाठ दुखायला लागली. आणि काहींच आठवेनासें झालें.

मग मी आणि विश्वास मंडपात गेलों. मी बोलणार असें सागितल्यावर सगळीं मुलें हंसायला लागलीं. त्याना वाटलें, मला काहीं येतच नाहीं, मीं नुसताच आगला गमत्या मुलगा आहे !

पण मीं मुळींसुद्धा हंसलों नाहीं. मुलानीं मला टपल्या मारल्या, माझ्या टोपीला कागदाची सुरळी अडकवून शिवाजी केलें तरी मीं हंसलों नाहीं. तशी मग थोड्या वेळानें सगळीं मुलें पण मला त्रास द्यायचीं थाबलीं. तेव्हा मला वाटलें कीं, मीं काहींतरी खूप मोठें केलें.

मग दोन मुलानीं भाषणें केलीं. एकाची टोपी वाकडी होती आणि दुसरा सारखें सूं-सूं करीत होता. दोघे खूप घाबरले आणि

सारखे अडखळले. सगळया मुलांनीं त्याची टर उडवली. मीसुद्धा नेहमीं असेंच करतों; पण त्या दिवशीं मला वाटलें कीं, मीच त्या मुलाऐवजी स्टेजवर आहें आणि मलाच मुलें हंसताहेत आणि मला तें इतकें खरें वाटलें कीं, मीं सदऱ्यात तोंड लपवलें.

मग विश्वास स्टेजवर उभा राहिला. त्यानें गुपचिप आईला न विचारता नवे कपडे घातले होते. पहिल्यानें तो विसरला आणि इकडेतिकडे पाहूं लागला. मुलें त्याची पण टर उडवायला लागणार होतीं, इतक्यात त्याला आठवलें आणि तो एकदम भराभर बोलायला लागला.

तितक्यात त्याचे बाबा पण तेथें आले. नुकतेच बाहेरगावाहून आले होते, तरी ते आले. त्यांनीं हंसून विश्वासला खूण केली, "जरा सावकाश." विश्वास हंसला आणि मग तो न घाबरता सावकाश बोलायला लागला. दोनदा तर तो हातवारे करून आपलें वाक्य जोरात ओरडला आणि मुलांनीं टाळ्या वाजवल्या मग तो खालीं बसला."

सगळीं मुलें म्हणालीं, "किती छान बोललास रे तूं! अगदीं गोष्ट वाचल्यासारखं वाटलं."

मग मी स्टेजवर गेलों. मला वाटलें, सगळें अगदीं सोपें आहे आणि विश्वाससारखी गंमत व्हायला नको म्हणून मी सुरुवात परतपरत लक्षात आणून ठेवली होती.

पण स्टेजवर गेल्यानंतर तीं एवढीं पुष्कळ मुलें पाहून कसेंसेंच वाटायला लागलें. सगळयांचे डोळे आपले माझ्याकडे 'लुकलुक' लागले होते. मधूनें दामूला टोचलें. मग ते दोघे कांहींसें कुजबुजले. मला वाटलें, ते एकदम ओरडतील, "एऽ गोद्या." पण ते नाहीं ओरडले.

मग मीं एकदम भरभर बोलायला लागलों—एकदां एक शब्द आठवेना, तर तो सोडून तसाच पुढें धावलों. मला वाटलें आई आली असेल म्हणून मी पाहायला लागलों. (एकीकडे मी बोलतच होतों बरें का.)

पण इतक्यात बाबा आले. त्यांच्या मिशा खूप मोठ्या दिसल्या. ते मोठ्यानें कोणालासें म्हणाले, "अरे, आमचा गोंद्या बोलतोय् वाटतं! वा!" आणि ते मोठ्याने हंसले.

त्यांच्याकडे पाहतापाहता मी एकदम भाषण विसरलों. आणि मग कांहीं

केल्या आठवेच्चना ! मीं अंऽ अंऽ करून डोकें खाजवलें. तशीं मुलांनीं मला वेडावलें.

मीं अगदीं घाबरून गेलों. खूपखूप डोकें खाजवलें तरी पुढचें आठवेना. अगदीं जवळ होतें, हातात सापडलें असतें, तरीपण आठवेना. मला अगदीं चेव आला. पाय थरथरू लागले, डोक्याला मुंग्या आल्या. शेवटीं अध्यक्षांनीं घंटा वाजवली आणि मीं खालीं उतरलों.

मुलें चिडवीत होतीं, " आम्हाला माहीत होतं. हा कसला बावळट बोलतो ! उगीच गंमत करायला गेला होतास ना रे ? "

माझ्या गळ्याशीं केवढा तरी गोळा आला. वाटलें कीं, सगळ्याना सागावे, " मारा, मारा मला एकदा. म्हणजे मी मरून जाईन ! " अगदीं एकटेंएकटें वाटायला लागलें. वाटलें, ' सगळें फुकट. ' आता कसला मी परदेशीं जाणार आणि मोठा होऊन परत येणार !

आइटली–फिइटली खोटें सागते काहींतरी. तरी मी सागत होतों, मला तसलें यायचें नाहीं म्हणून. तरी म्हणे, ' ज्या, क्यर भॅषण ! ' आता परत असं कध्धींकध्धी करणार नाहीं मी. "

बाबा म्हणाले, "हत्, गाढवा" आणि निघून गेले. इतका भयंकर राग आला मला. वाटलें कीं, कृष्ण जसा कंसाच्या छातीवर बसला तसें करावें अगदीं.

दामू म्हणाला, " काय पण फजिती झाली एका माणसाची !"

मी चिडून त्याला मारणार होतों, पण सगळीं मुलें त्याच्या बाजूचीं होतीं.

मग मला एक गंमत आठवली, " मी म्हटलें, अरे चल. मीं काहीं बक्षीस मिळवायला नव्हतों गेलों तिथं, मला आपली गंमत करायची होती."

तो म्हणाला, "चल खोटं."

मीं म्हटलें, " मग आधींचं कसं नीट बोललों मी ? पण बक्षीस पाहिजेच कुणाला ? मिळवूं देत तीं हुष्षार मुलं. आपण बुवा अशीच गंमत करणार. " आणि मग मी खूप मोठ्यानें हसलों.

विश्वासला पहिलें बक्षीस मिळालें, सगळ्या मुलानीं टाळ्या वाजवल्या.

मला इतका राग आला ! वाटलें कीं सगळ्या लोकांना हत्ती होऊन तुडवावें, नाहीं तर औरंगजेब होऊन त्याच्या माना उडवाव्या !

मग विश्वासचे वडील त्याला घेऊन बाहेर गेले. खाऊ घेऊन देणार

असतील ते त्याला, सिनेमाला नेतील—एवढा मोठा झाला तरी दोन्हीं हातांनीं उंच करतील.

मला एकदम रडूं आलें. विश्वास लांब होता. तरी मीं स्वतःशींच त्याला म्हटलें, "काय समजला आहेस रे तूं ? सारखी आपली मिजास तुझी. जिथंतिथं विश्वास-विश्वास ! आम्हीं म्हणजे कोणीच नव्हे वाटतं ! दम धर. अशी जिरवतों तुझी " मीं दात ओठ अगदीं घट्ट आवळले आणि जानवें तर इतक्या जोरानें ओढलें कीं, माझ्या मानेला काच लागली !

आणि मग मीं एकटाच एका बाजूला दगडावर बसलों.

मग खूप पाऊस पडला. मला वाटलें, 'आणखी पडूं दे. ' खूप पडूं दे. आमची वाडी सगळी बुडून जाऊं दे. ' मीं रागारागानें डोंगळे मारले.

थोड्या वेळानें पाऊस थांबला. विश्वास एकटाच तिकडून हंसतहंसत आला. त्याचे नवे कपडे त्यानें मुळींच भिजविले नव्हते. कपडे भिजवले तर त्याची आई खूप रागावते आणि त्याला मारते.

त्याला पाहिल्यावर मला परत खूप राग आला.

आणि मग मला एक गंमत आठवली.

मी हंसून म्हटलें, "ए विश्वास, इकडे ये. तुला गंमत सांगायची आहे" तो आला. मग मी त्याच्याशीं कांहींतरी बोललों आणि त्याचें लक्ष नाहीं असें पाहून मी त्याला जोरानें ढकलून दिलें !

तो धपकन् पाण्यात पडला. त्याचे सगळे कपडे मळले. त्याच्या हाताला कौलाचा तुकडा लागला.

मी चटकन् दूर पळालों. तो उठला आणि माझ्या अंगावर धावला. मी आणखी दूर पळालों. मग तो एकदम रडायला लागला. तो म्हणाला, "असं का रे करतोस तूं ? मी काय केलं होतं तुझं ? मला मारलंस तरी चालेल, पण माझे कपडे कां मळवलेस ? आता आई मला खूर मारील. अगदीं मरेमरेतों मारील. बाबा आता संध्याकाळपर्यंत यायचे नाहींत. " आणि तो रडत घरीं गेला.

माझ्या पोटात खोल कुठेंतरी कोणींसें रडलें. मीं त्याला म्हटलें, "चूप" आणि खूप उंच उडी मारली. मला खूप मौज वाटली.

मग मला एक गंमत आठवली. मीं घरात जाऊन बसलों. पलीकडच्या

खोलींत विश्वासची आई त्याला ओरडत होती आणि मारत होती; तें मला सगळें ऐकायला येत होतें.

विश्वास रडत होता—छान झालें.

पण विश्वासची आई त्याला आणखी मारायला लागली तशी मला कसेसेंच वाटायला लागले. माझ्या अंगातून वर्तुळें धावलीं. मीं तिथेंच म्हटले, " पुरेपुरे आता ! " पण ती आणखी आणखी मारत होती.

मग मी एका कोपऱ्यात लपून बसलों. सदऱ्यानें तोंड झाकलें. शेवटीं एकदा तें मारणें संपलें. विश्वास रडत रडत बाहेर गॅलरींत येऊन बसला. त्याच्या अंगात शर्ट नव्हता. त्याची पाठ चागली लाल झाली होती.

माझ्या पोटातलें रडणे एकदम वर आलें. काल रोजीं आईनें सांगितलेली गोष्ट आठवली वाटलें, कीं चागला मुलगा व्हावें आणि विश्वासला म्हणावें, " लागलं का रे तुला ! चुकलं माझं. पुन्हा कध्धीं असं करणार नाहीं. "

म्हणून मी त्याच्याजवळ गेलों देखील, पण मला एकदम भीति वाटली. म्हणजे तो मारेल म्हणून नव्हे हं ! निराळीच. काचेचं भाडं हातातून पडल्यावर वाटते तशी.

मी जवळ आलेला पाहून विश्वासानें माझ्याकडे पाहिलें. मग मी जास्तच घाबरलों आणि आठवली एकदम गंमत.

मीं पटकन् त्याला टपली मारली आणि खूप मोठयानें हंसत पळालों.

कशी केली गंमत !

—स्त्री मासिक, जून १९४६

## चुंबन ७

निर्मला हातातील पुस्तकें सावरून जिना उतरूं लागणार इतक्यात हेड-मास्तराच्या खोलीच्या फ्लॅपडोअरचा धाडकन् आवाज झाला, आणि केळकरमास्तर रागानेंच बाहेर पडले. जिना उतरताना त्याच्याकडे प्रश्नार्थक नजर टाकीत निर्मला म्हणाली, "भांडलात वाटतें हेडमास्तराशीं ?"

"होय. मूर्ख माणसाची अरेरावी चालूं द्यायची नाहीं असा माझा निश्चय आहे." आणि जणूं आपल्या शब्दातील कटुता कमी करण्याकरिता ते हंसले.

"आणि तुम्हाला काढून टाकलें म्हणजे ? मला बाई भीति वाटते तुमची" निर्मला नापसंतीनें म्हणाली.

"मला काढून टाकलें तर मी एक पानपट्टीचें दुकान काढणार आहें." केळकरमास्तर काहींसें लहरीपणानें म्हणाले, आणि मग त्यानीं निर्मलेकडे निरखून पाहिलें.

"इश्श, तसें कसें !" निर्मला एकदम म्हणाली. आणि पुरुषाच्या बेजबाबदारपणाचें तिला आश्चर्य वाटलें.

"असें. तुम्हाला माझी काळजी वाटते !" केळकर किंचित् तिच्या जवळ सरकून म्हणाले.

"हो सगळ्याचीच वाटते मला काळजी." निर्मला शक्य तितक्या सहजपणें म्हणाली. आणि आपला गोंधळ लपविण्याकरिता तिनें हातातील पुस्तकाची उगीचच चाळवाचाळव केली.

केळकराना वाटलें कीं, आपलें मनोगत कबूल करील तर ती स्त्री कसली ! आणि तिचा अधिकच गोंधळ उडविण्याच्या हेतूनें ते म्हणाले, "तर मग माझी नोकरी गेल्यावर मी तुमच्याकडेच राहायला येणार आहें."

निर्मलानें खालीं मान घालून खालच्या ओंठावर दात रोवल्यासारखें केलें, आपला पदर उगीचच खांद्यावरून ओढून घेतला, आणि ती स्तब्ध राहिली. तिला वाटलें केळकरानीं असें बोलायला नको होतें. आणि मग रोषाची एक सूक्ष्म छटा तिच्या मनात येऊन गेली.

आपला उद्देश सिद्धीस गेला म्हणून केळकराना थोडेंसें हंसू आलें आणि लज्जेच्या मनोहर जालानें अधिक मोहक दिसणाऱ्या तिच्या सुंदर चेहऱ्या-वरची नजर काढणें त्याना कठीण वाटलें. मग उसन्या गंभीरपणानें ते म्हणाले, "परवा मी एक सिनेमा पाहिला."

"नाहीं तरी फारच सिनेमा पहाता तुम्ही." निर्मला एकदम बोलून गेली. आणि मग तिला वाटलें आपल्याला असें म्हणण्याचा काय अधिकार ?

एखाद्या लहान मुलानें दरडावणाऱ्या माणसास आपल्या गुन्ह्याचें कारण सांगावें तसें ते म्हणाले, "माझ्या आवडत्या नटीचें काम होतें त्यात." आणि खोडकरपणानें ते पुढे म्हणाले, "आणि ह्या चित्रपटात ती रुसते ती हुबेहुब तुमच्यासारखी."

"इश्श, मी कधीं रुसलें होतें तुमच्यावर ?" निर्मला चमकून म्हणाली. आणि संभाषणाचा हा ओघ बदलावा असें केळकराना कसें सुचवावें तें तिला कळेना

"वा ! आत्ताच रुसला होतात कीं." खोडकरपणानें हंसत केळकर तिच्याजवळ सरकले, आणि तिच्या चेहऱ्यावरचा गोड गोंधळ पाहाण्या-करिता त्यानीं तिच्यावर नजर स्थिर केली.

निर्मलेनें जोराने मान हलविली. तिला वाटलें कीं, नको तें बोलायची केळकराना संवयच आहे.

"तुमचा विश्वास पटत नाहीं असें दिसतेंय्. चला आपण पाहूं या तो सिनेमा. म्हणजे खात्री पटेल तुमची." केळकर तिच्याजवळ सरकत अनु-नयाच्या स्वरानें म्हणाले.

केळकराचा उष्ण श्वास आपल्या गालाला लागला असें निर्मलेला वाटलें. आणि ती झटकन् बाजूला झाली आणि मग त्याच्याकडे न बघतां म्हणाली,

"अं हं ! मला आता माझ्या मैत्रिणीकडे जायचें आहे."

"अच्छा. तरी हरकत नाहीं. आपण नंतरच्या शोला जाऊं. मात्र तुम्ही घरीं असा हं." केळकर मोकळेपणानें म्हणाले.

आणि आपल्याला त्यांच्याबरोबर सिनेमाला जायचें नाहीं हें त्याना न दुखवता कसें सांगावें तें निर्मलेला कळेना. आणि ती घाईनें म्हणाली, "बरें, जातें मी आता. मला ह्या बाजूला जायचें आहे."

तेव्हा केळकर म्हणाले, "अच्छा. पण विसरूं नका हं. मी येईनच तुमच्या घरीं." आणि त्यांनीं हस्तांदोलनाकरिता हात पुढें केला. आपल्या हाताला त्यांच्या हाताचा निसटता स्पर्श झाला असें निर्मलेला वाटलें, आणि झटकन् आपला हात मागें घेऊन ती दूर झाली. काही तरी विचित्र गोष्ट घडणार होती आणि ती आपण टाळली ह्याचें भीतियुक्त समाधान तिच्या तोंडावर स्पष्ट दिसत होतें आणि केळकरांनीं जेव्हा तिच्या चेहऱ्यावरील त्या आविर्भावाकडे आश्चर्यानें पाहिलें तेव्हा ती गोंधळून गेली. आपल्या वागणुकीनें केळकरांचा अपमान झाला ह्या जाणिवेने तिला वाईट वाटलें. आणि मग तो अप्रिय प्रसंग अधिक लांबूं नये म्हणून ती तिथून झटकन् निघून गेली.

आणि रस्त्यातून चालताना अनेक विचारांचें काहूर तिच्या डोक्यात माजलें होतें. कसला तरी विचित्र खेद आणि त्रास तिच्या मनाला अस्वस्थ करीत होता. केळकरांच्या तिच्याविषयीं काय भावना होत्या हें तिला माहीत नव्हतें असें कसें म्हणता येईल! लहानसहान गोष्टींत व्यक्त होणारें त्यांचें प्रेम कळण्याइतकें स्त्रीसुलभ चातुर्य तिच्याजवळ होतें, आणि तिला देखील त्यांच्याविषयीं जिव्हाळा वाटत असे. एखादे दिवशीं ते शाळेंत आले नाहींत म्हणजे तिच्या मनाला उगीचच चुटपुट लागे. त्यांचा आणि हेडमास्तरांचा खटका उडाला म्हणजे ती भयभीत होऊन जात असे आणि हेडमास्तरानादेखील भीक न घालणाऱ्या केळकरमास्तरांनीं निर्मलेची दटावणी अनेक वेळा मुकाट्यानें ऐकून घेतली होती.

पण स्त्री आपल्या प्रियकराकडून जो प्रश्न ऐकायला उत्सुक असते, तो प्रश्न जेव्हा केळकरांनीं तिला विचारला होता तेव्हां ती गोंधळून गेली होती. हो म्हणावें असें तिला वाटेच ना. तिला वाटलें होतें कीं, उत्कट प्रेम करण्याची शक्ति आपल्या जवळून, कायमची नष्ट झाली आहे. आणि ह्यापुढें आपल्याला पुरुष

विषयीं फार तर मित्रभावच वाटूं शकेल. स्त्री–पुरुष परस्परापासून जें सुख मिळवायला उत्सुक असतात त्या बाबतींत ती अगदीं उदासीन होती. आपल्या जीवनातील तो भाग संपला असें तिला निश्चितपणें वाटत असे. त्यामुळें आपल्या जीवनात भासणारी उणीव भरून काढण्याकरिता कीं काय तिनें आपल्या भोंवतीं कामाची गर्दी करून घेतली होती. आणि तिला वाटत होतें कीं, केळकरमास्तर आपल्या आयुष्यात अकल्पितपणें आले नसते तर ही उणीव आपल्याला थोडीदेखील जाणवली नसती.

निर्मलेनें समोर पाहिलें तों एक तरुणी आपल्या प्रियकराच्या हातात हात अडकवून निःशंकपणें हंसतखिदळत चालली होती. निर्मलेला तिच्या धारिष्टाचें आश्चर्य वाटलें आणि भीतीच्या सूक्ष्म संवेदनेनें ती थरारली. पुरुषस्पर्शाविषयीं कसली तरी विचित्र भीति तिच्या मनात वास करीत होती. पोहायला शिकणारा मनुष्य न कळत खोल पाण्यात जावा आणि तेथें त्यानें डुबकी खावी आणि मग जसा तो पाण्यात उतरायला कचरतो, पोहणारीं माणसें पाहून जसें त्याला आश्चर्य वाटतें आणि पोहण्यात खरोखरच कांहीं सुख आहे का अशी देखील शंका जशी त्याच्या मनात डोकावते, तसेंच कांहींसें निर्मलेचें झालें होतें.

ती मॅट्रिक होईपर्यंत तिचे दिवस श्रीमंतींत गेले होते. आणि बड्याबड्या व भाडखोर बहिणींच्या सहवासात आपले विचार प्रकट करायला कधीं वावच न मिळाल्यामुळें ती कांहींशी अबोल झाली होती. लहानपणीं पुष्कळ दिवस आजारीपणात काढल्यामुळें तिच्या स्वभावात एक प्रकारचा खोलपणा आणि भित्रेपणा आला होता. आणि ह्या अशक्त मुलीची तब्येत घरातील सर्व माणसें संभाळत असल्यामुळें ( आपल्या आईची तर ती विशेष लाडकी होती ) एक प्रकारचा हट्टीपणा तिच्या स्वभावात उतरला होता. आणि इतरांचीं मनें कळून तीं न दुखविण्याची गोड आणि हळुवार मनोवृत्ति तिच्याजवळ नसती तर तिचा स्वभाव इतराना इतका आकर्षक वाटला असता कीं नाहीं कोण जाणे.

पण ती मॅट्रिक झाल्यानंतर तिच्या वडिलानीं व्यापारात ठोकर खाल्ली होती. आणि तिचें लग्न एका साधारणशा चलाख कारकुनाशीं लावून देणें त्याना भाग पडलें होतें. सर्वांना निर्मलेचा नवरा पसंत पडला होता. पण ह्या खोल

मनाच्या अबोल मुलीला त्याच्याविषयीं पहिल्याच दिवशीं एकदम तिटकारा वाटला. आणि तिनें मन मारायचा पुष्कळ प्रयत्न केला तरी तो तिटकारा सारखा वाढतच गेला होता.

पहिल्या रात्रीं आपल्या मालकीचीच वस्तु अशा तोऱ्यात जेव्हा त्यानें तिला आडदांडपणें स्पर्श केला तेव्हा तिच्या मनाला असह्य ताप झाला होता. आणि त्यानंतर त्याच्या सतत वेळीं अवेळीं आत्मप्रौढी मिरविण्याच्या संवयीनें तर तिच्या मनातील तिरस्कार वाढतच गेला. लहान–सहान बाबतींत तिचें मन मोडून आपलें म्हणणें खरें करण्याच्या त्याच्या खोडीची तिला मनस्वी चीड येत असे, आणि त्याची पाय काढून चालण्याची लकब म्हणजे त्याच्या ह्या किळसवाण्या मनोवृत्तीचें प्रतीकच असें तिला वाटे.

आणि पुढें पुढें तर ती चीड इतकी वाढत गेली कीं तो दृष्टीस पडला, सहज काहीं बोलला तरी तिला तें असह्य होई. आणि त्या माणसाशीं आपलें मन दाबून प्रेमानें वागताना, त्याच्याकरिता गुलामासारखें राबताना आणि इच्छेविरुद्ध त्याला आपलें शरीर अर्पण करताना तिला ज्या मनस्वी यातना होत त्यानीं तिला वेड कसें लागलें नाहीं हें मोठें आश्चर्य होतें. सतत आजारी पडणाऱ्या माणसात जी एक प्रकारची सहनशीलता आढळून येते तीच बहुधा तिच्या मदतीला आली असावी.

आणि सुदैवानें म्हणा अगर दुर्दैवानें म्हणा दोन महिन्यातच तिचा पति मरण पावला आणि त्या प्रसंगीं इतर माणसें धाय मोकलून रडत असता ह्या मुलीच्या डोळयातून एक अश्रूदेखील आला नव्हता. आपल्या निर्दयपणाची शरम वाटून जरी तिनें मुद्दाम दुःखी होण्याचा प्रयत्न केला होता तरी त्या रात्रीं एकटें निजताना जें विलक्षण सुख आणि मोकळेपणा तिला वाटला त्या भरात एक गाण्याचा चरण गुणगुणण्याचा मोह तिला अनिवार झाला होता. आणि थोड्याच दिवसानीं सर्वांच्या दृष्टीनें पांढऱ्या पायांची ठरलेली ही सून आपली छोटी बॅग घेऊन टीकेला आणि वाक्ताडनाला न जुमानतां घरातून बाहेर पडली ती स्वतंत्र आणि मोकळें जीवन कंठण्याच्या जबरदस्त ईर्षेनें. आणि घरांतून बाहेर पडल्यावर तिला वाटलें होतें कीं, त्या घरांत आपण कधींच अनुभवला नाहीं असा विलक्षण ताजेपणा आणि गारवा हवेंत भरून राहिला आहे.

आणि त्याच वेळेला तिला वाटलें होतें कीं–वैवाहिक जीवन म्हणतात तें अनुभविण्याची शक्ति आता आपल्यात राहिलेली नाहीं.

आता सुद्धा हाच विचार तिच्या मनात जोरानें आला. आणि मीनाच्या घराच्या पायऱ्या चढत असताना तिनें अगदीं निश्चय केला कीं केळकर-मास्तराच्या बरोबर सिनेमाला तर जायचें नाहींच, पण ह्यापुढें त्याच्याशीं फारसें बोलायचें देखील नाहीं. दुसऱ्याशीं तुटकपणानें वागण्याइतका देखील खंबीरपणा आपल्याजवळ नसावा ह्याचा तिला राग आला.

मीनाच्या दाराजवळ ती आली तों घरात अगदीं शांतता होती, आणि त्यावरून निर्मलेनें ओळखलें कीं मीना बहुधा घरीं नसावी, आणि आपण परत फिरावें असा निश्चय करीत असतानाच निर्मलेनें घंटेचें बटन दाबलें. मीनाच्या दाराची कडी जेव्हा खाडकन् वाजली जेव्हा निर्मलानें ओळखलें कीं, मीनाचे यजमान आनंदराव घरात आहेत. आणि ही निरर्थक अनुमान शृंखला पुढें मजल मारणार इतक्यात आनंदरावानीं तिचें सहास्य मुद्रेनें स्वागत केलें

“ वा. छान आहे हं तुमचें वेळेवर येणें. बिचारी मीना इतका वेळ तुमची वाट बघून आताच बाहेर गेली ” आनंदराव दार अडवीत म्हणाले.

“ अगबाई. म्हणजे अगदीं घुस्सा झाला असेल बाईसाहेबाचा माझ्यावर. बरे, सांगा मी आलें होतें म्हणून. आणि माझ्या वाटणीची समजूत पण काढा तिची. ” आणि एक गोड हास्य करून निर्मला परत जायला निघाली.

“ वा, वा, चांगलेंच आहे हें. तुम्हाला मी बसवून घेतलें नाहीं तर माना माझा कान पकडल्यावाचून रहाणार नाहीं. येईलच ती अर्ध्या तासात. ” आनंदराव दारातच उभे राहून म्हणाले.

“ इश्श, पण तुम्हीं मला उंदीर बिंदीर समजलात कीं काय ? तुम्हीं असें दार अडवून उभे राहिल्यावर मी आत तरी येऊं कशी ? ” निर्मला हंसून म्हणाली.

“ छे, बोवा. माझा हा चक्रमपणा काहीं कधीं जायचा नाहीं अंगातून. ” असें मोकळेपणानें हंसत म्हणून आनंदराव बाजूला झाले आणि आत शिरतांना निर्मलेला वाटलें कीं, नेहमीं मोकळेपणानें आणि हंसत खेळत वागण्याची हातोटी ह्या माणसाला अगदीं साधून गेली आहे.

आनंदरावाच्या मनमोकळया आणि आनंदी स्वभावाचें निर्मलेला नेहमीं कौतुक वाटत असे. आणि आपल्या सर्व मैत्रिणींत जहांबाज मीनालाच तेवढा असा खेळकर आणि हसरा नवरा मिळावा ह्याचें तिला आश्चर्य वाटलें.

त्यानंतर आनंदरावानीं आपल्या कपातील चहाची निर्मलेकरिता इतकी काटेकोर वाटणी केली कीं तिला हसूं लोटलें. आणि ती नको नको म्हणत असता तिला इतक्या आग्रहाने तो प्यायला लाविला कीं निर्मलेला वाटले ह्या माणसानें आग्रह केल्यावर नाहीं म्हणणें अगदीं वेडेपणाचें आहे. त्यानतर अर्धा तास आनंदरावानीं इतक्या गमतीदार गोष्टी तिला सांगितल्या, आणि तिला सुद्धा इतके गमतीदार बोलायला लावलें कीं आपल्याजवळ इतकें संभाषणचातुर्य आलें तरी कोठून ह्याचें तिला आश्चर्य वाटलें आणि मग तिच्या मनात असा विचार आला कीं दगड मुलाना देखील भराभर प्रश्नाचीं उत्तरे द्यायला लावण्याची हातोटी जशी केळकरमास्तराजवळ आहे तशीच अबोल माणसाना संभाषणचतुर करणारी जादू ह्या माणसाजवळ असली पाहिजे.

हा विचार मनात आल्यावर तिनें त्याच्याकडे निरखून पाहिले. तेव्हा बटनें उघडीं असल्यामुळें मोकळा पडलेला त्याच्या भरदार छातीचा भाग तिच्या दृष्टीस पडला. आणि त्यासरशीं ती दचकून एकदम सावरून बसली, आपला पदर तिनें खांद्यावरून ओढून घेतला आणि तिच्या संभाषणाचा ओघ एकदम खंडित झाला.

तेवढ्यात आनंदराव जाग्यावरून उठले आणि एक मखमलीची पेटी घेऊन येत म्हणाले " ओळखा पाहूं ह्यात काय असेल तें ? "

" असेल काहींतरी, कुडीं नाहींतर अंगठी " निर्मला जांभई देत म्हणाली.

" बरोबर ओळखलेंत हिऱ्याची अंगठी आहे. खास मीनाकरिता आणली होती परवा मीं, पण तिला त्या खड्याचा रंग नाहीं पसत पडला. आता तुम्हींच सागा हं, वाईट का आहे ह्या खड्याचा रंग ? " आनंदराव त्या खड्याकडे पहात म्हणाले.

" पाहूं " निर्मला हात पुढें करीत म्हणाली.

" अंहं, इतक्या उजेडात नाहीं त्याची मौज कळायची. इकडे ह्या ड्रेसिंग

टेबलाजवळ या." आणि आपल्या हातानें त्यावर काळोख पाडून ते तिकडे त्या खड्याकडे पाहूं लागले.

निर्मला काहींशा नाखुषीनें जाग्यावरून उठली पण त्या हिऱ्याचें तेज तिला एकदम आवडलें. स्त्रीसुलभ उत्सुकतेनें त्याच्याकडे ती अगदीं निरखून पाहूं लागली आणि त्या भरात आपण आनंदरावाच्या कितो जवळ सरकलों ह्याचें तिला भान राहिलें नाहीं. त्या खड्याच्या तेजाकडे पहात असता तिला वाटले "खरेंच किती रसिक नवरा मिळाला आहे मीनाला!"

तेवढ्यात आनदराव म्हणाले, "अ, आता तुम्हींच सागा पाहूं." तेव्हा तिच्या एकदम ध्यानात आलें कीं आनदराव आपल्या अगदीं जवळ आहेत. आणि स्त्रीस्पर्शाला उत्सुक झालेल्या पुरुषाच्या स्वरात जो विशिष्ट घोगरेपणा येतो तो त्याच्या आवाजात आहे कीं काय असा तिला संशय आला. त्या-सरशीं तिनें एकदम दचकून वर पाहिले, आणि तिला वाटलें कीं आपल्या केसाना आनंदरावाच्या ओठाचा स्पर्श झाला. मग जेव्हा ती एकदम भावा-वून दूर सरकूं लागली तेव्हा तिचें वक्षःस्थल आनंदरावाच्या दंडावर घासलें गेलें; आणि मग काय होत आहे तें कळायच्या आधींच आनंदरावानीं तिला आपल्या बाहुपाशात घट्ट घेतलें. आणि ती काहीं हालचाल करणार इतक्यात त्यानीं आपले थरथरते गरम ओंठ तिच्या ओठावर टेकले.

निर्मला घरीं गेली तेव्हा तिला अगदीं थकल्यासारखें वाटत होते, आणि तिच्या घशाला कोरड पडली होती तिला अगदी मनस्वी चीड आली होती, केळकराची, मीनाची, आनंदरावाची आणि स्वतःची देखील. आणि ती घरीं येत असता उगाच ठण्ठण् असा आवाज करून डोकें उठविणाऱ्या त्या ड्रायव्हरची तर तिला सर्वांत जास्त चीड आली होती. आपला राग व्यक्त करण्याकरिता तिनें आपली उशी जोरात दूर भिरकावली, आणि त्या दूर कोपऱ्यात जाऊन पडलेल्या उशीकडे पहात असतानाच, इतका वेळ थबकलेले अश्रु तिच्या डोळ्यातून टपटप ओघळूं लागले आणि त्यानंतर उशींत डोकें खुपसून हुंदके आवरताना तिला कमालीचा उदासपणा वाटूं लागला. कुठें तरी एकाकी जाऊन राहावें असें तिला वाटत होतें आणि हा तीव्र सूर्यप्रकाश जाऊन संध्याकाळचा काळोख येईल तरी कधीं असें तिला होऊन गेलें.

पण इतक्यात ती ज्या वनिता समाजाची सेक्रेटरी होती तिथली एक बाई आली, आणि त्या दिवशीं व्याख्यान असल्याची आठवण तिनें निर्मलेला करून दिली. तिनें त्या दिवशीं जाणें अगदीं अवश्य होतें. आणि मघाची चीड परत तिच्या मनात उसळून आली. त्या सेक्रेटरीशिपवर आणि त्या व्याख्यानावर चरफडत ती समाजात गेली. तिथें जमलेला तो बायकाचा मेळावा आणि त्याची कुजबुज ऐकून तिला अधिकच कंटाळा आला, आणि ह्या वनिता समाजात आपण इतके दिवस मजेंत घालविले तरी कसे ह्याचें तिला आश्चर्य वाटलें व्याख्यात्याचा परिचय करून देताना पुष्कळ दिवसाचा सराव असून देखील ती अडखळली, आणि व्याख्यात्यानीं जेव्हा घसा खाकरून आधुनिक पुरोगामी तरुणींच्या कर्तव्यावर जोरदार व्याख्यान देण्यास सुरुवात केली तेव्हा तिला अधिकच कंटाळा आला. जीं वाक्यें ऐकून इतराबरोबर तिनें उत्साहानें टाळया वाजवल्या होत्या तीं वाक्यें तिला शिळीं आणि रुक्ष वाटू लागलीं.

आणि जेव्हा व्याख्यात्याचें व्याख्यान अधिकच लांबलें तेव्हा तिला अगदीं चेव आला आणि आपलें मस्तक फुटून जातें कीं काय असें तिला वाटलें. आणि मग तिच्या मनात असा वेडा विचार आला कीं सगळयाना ओरडून सागावें कीं, आधुनिक तरुणींचें कर्तव्य आपल्या प्रियकराचीं चुंबनें घेण्याचें आहे आपल्या त्या विचारानें ती अतिशय दचकली, आणि असले मूर्ख विचार करणाऱ्या आपल्या मनाला तिनें चागलेंच दटावलें. आणि मग तिला जेव्हा तें सर्व अगदीं असह्य झालें तेव्हा काहीं तरी सबब सागून ती तेथून सटकली.

घरीं आल्यावर ती स्वस्थपणें अंथरुणावर पडली आणि तिला थोड्याच वेळानें झोंप लागली, इतका विलक्षण थकवा तिला वाटत होता. तिला तशी किती वेळ झोंप लागली होती कोण जाणे. पण तिला वाटलें कीं, आपल्याला कोणीतरी गदगदा हलवून उठवीत आहे. तिने डोळे उघडून पाहिलें तों केळकरमास्तर तिला अगदीं खेटून उभे होते. तिनें ताडकन् त्याच्या गालावर प्रहार केला आणि ती चिडून म्हणाली, "तुम्हीं दुष्ट आहांत, लबाड आहात. कपटी ढोंगी कुठचे. चला निघा इथून. तुमचें तोंड देखील पहाण्याची माझी इच्छा नाहीं." आणि मग त्वेषानें संन्यासिनी बनून ती

हिमालयात गेली, आणि तिथल्या एका तरुण साधूनें तिचें चुंबन घेतलें— ती दचकून जागी झाली आणि तें स्वप्नच होतें ह्याचें तिला समाधान वाटलें.

नंतर बहुधा तिला परत झोंप लागली असावी. कारण ती जागी झाली तेव्हा अंधार पडूं लागला होता. तिच्या अस्वस्थ मनावर थंड पाण्याचा शिडकाव केल्यासारखें तिला वाटत होतें. तिला आवडणाऱ्या एका सैगलच्या रेकॉर्डचे शांत मधुर स्वर तिच्या कानावर हलकेच येत होते. त्या स्थितींत तिला ते स्वर विलक्षण सुखदायक वाटले.

निर्मलानें हातात हात अडकवून एक मोठी जांभई दिली. जणुं कांहीं होऊन गेलेल्या गोष्टींबद्दल चिडण्याचा आणि चरफडण्याचा वेडेपणा आतां पुरे असें तिनें आपल्या मनाला सुचविलें. त्या प्रशांत मनःस्थितींत ती बिछान्यावर किती वेळ पडून राहिली असती कोण जाणे. पण इतक्यात दिवा लागला आणि तिनें डोळे किलकिले करून पाहिलें तो केळकरमास्तर!

ते हसत म्हणाले, "वा, चांगलें आहे मास्तरीणबाई. खुशाल दार उघडें टाकून झोपला होतात. एखादा चोर येऊन घेऊन जायचा कांहीं."

निर्मला कांहींशीं आपल्याशींच म्हणाली, "तुम्हींच आला आहात कीं सर्वांत बडे चोर!" केळकरमास्तरांनीं तें ऐकलें असावें. कारण ते पुढें सरकून कांहींतरी गमतीदार उत्तर देणार होते. पण तितक्यात निर्मला झट-कन् उठून म्हणाली, "थांबा हं. मी चहा करतें" आणि ती पटकन् आतल्या खोलींत पळाली.

निर्मला जेव्हा चहाचे कप घेऊन बाहेर आली तेव्हा केळकरमास्तर आपल्या भसाड्या आवाजात मघाचेंच सैगलचें गाणें गुणगुणत बसले होते. निर्मलेला एकदम हंसूं आलें आणि तिनें मान हलाविली. जणुं तिला म्हणायचें होतें कीं ह्यांना कितीहि समजावून सांगितलें तरी ह्यांना कांहीं आपला आवाज भसाडा आहे हें पटायचें नाहीं.

तिनें समोरच्या टेबलावर कप ठेवले, आणि मग ती पटकन् त्यांच्या शेजारीं बसली. पण तितकेंच. त्यानंतर ती एकदम स्तब्ध झाली आणि खिडकीबाहेर शून्य नजरेनें पाहूं लागली. केळकरमास्तरांनीं चहाचा कप उचलला; पण निर्मलेला तशी बसलेली पाहून त्यांनीं तो खालीं ठेवला आणि ते मृदु स्वरांत म्हणाले. "घ्या ना तुम्हीं चहा." आणि तरी

तिला तशीच बसलेली पाहून ते अधिकच हलक्या आवाजात म्हणाले, "घे ना." पण निर्मलानें पायाची नुसती चाळवाचाळव केली, आणि त्याच्याकडे एकवार दृष्टिक्षेप टाकून ती खालीं पाहूं लागली. तेव्हा ते तिचा हात हातात घेत म्हणाले, "का? बरें नाहीं वाटत?" आणि त्याच्या हस्तस्पर्शातून त्याना वाटत असलेली काळजी व्यक्त होत आहे असें निर्मलेला वाटलें. ती काहींच बोलली नाहीं, आणि तिनें आपला हात सोडवून घेण्याचा एक क्षीण प्रयत्न केला. पण केळकरानीं तिचा हात जरा दाबल्यासारखें केलें आणि तेवढयावरच तिचा तो प्रयत्न थांबला. एकवार आपली मान वर करून तिनें केळकराच्या आपल्याकडे लागलेल्या दृष्टीकडे पाहिलें. क्षणमात्र तिची चलबिचल झाली आणि मग एकदम आवेगानें त्याना बिलगून ती प्रेमानें कातर झालेल्या आवाजात म्हणाली, "अरविंद" आणि तिनें आपले ओठ त्याच्या ओठावर टेकले.

वाङ्मय–शोभा, जून १९४४

# चुकलेली प्रेमकथा

# ८

" ......रस्त्यात आल्यावर त्यानें घड्याळांत पाहिलें तों साडेआठ वाजले होते. खरें म्हटलें म्हणजे मी आठ वाजता येईन असें त्यानें शीलाला सांगितलें होतें. तेव्हा शीला फुरंगटून म्हणाली होती, ' पुरे झालें तुमचें ! असें सांगायचें आणि कध्धीं वेळेवर यायचें नाहीं. ' ह्यावर नुसता हंसला होता तो !

" पण शेवटीं झालाच होता उशीर. ह्याच बेफिकीर मनोवृत्तीनें त्यानें शीलाला जिंकलें होतें. आपल्या अव्यवस्थित केसातून त्यानें निष्काळजी-पणानें हात फिरवला, आणि सहज खिशांत हात घातला. अन् केवढ्यानें चमकला तो ! खिशात सिगरेटचें पाकीट नव्हतें. विलक्षण चिडून तो म्हणाला, " Oh ! Damn ! " जणुं त्या क्षणीं सिगरेटच्या पेटीशिवाय इतर सर्व गोष्टी—याचो शीलादेखील—त्याच्या दृष्टीनें कवडीमोल होत्या !... "

त्या खच्चून भरलेल्या मोटारींत देखील श्रीधर हें सारें मोठ्या भक्तिभावानें वाचत होता. त्या नायकाविषयीं त्याला भयंकर आदर वाटत होता. त्याची अशी अगदीं खात्री झाली होती की, जगाकडे बेफिकीर ऐटीनें पाहून 'Oh ! Damn' म्हणणें ह्यांतच माणसाचें सारें शहाणपण आणि सुसंस्कृतपणा साठविलेलीं आहेत. आणि त्या नायकानें ते दोन शब्द कसे ऐटीत म्हटले असतील ह्याची पुरती कल्पना येण्याकरितां त्यानें ते शब्द स्वतःशींच अर्ध-वट उच्चारूनदेखील पाहिले.

आणि त्याच वेळेला त्याच्या शेजारीं बसलेल्या अच्युतनें चिडून म्हटलें 'Oh ! Damn'

श्रीधरनें चमकून त्याच्याकडे पाहिलें. त्याला जें सावलें नव्हतें तें अच्युतनें

अगदीं सहजपणें केलें होतें. हुबेहुब त्या नायकाच्या ऐटीनें त्यानें ते शब्द उच्चारले होते.

" काय झालें बुवा ? अशा अर्थाचा एक दृष्टिक्षेप श्रीधरनें आजुबाजूस टाकला.

एक साधारण वयस्क बाई त्या भरलेल्या मोटारींत शिरण्याचा प्रयत्न करीत होती. मोटारींतलें सारें वातावरण शत्रुत्वाचें होतें. आणि तिला जागा देण्याकरिता कोणी एक रेंसभरहि हलण्यास तयार नव्हता.

अच्युत चिडला होता तो ह्याच बाईवर.

ती बाई बिचारी तशीच अवघडून उभी होती. ती कोणाशीं भांडली नाहीं अगर तिनें कोणाची विनवणी केली नाहीं. ह्या इतक्या लोकाच्या मर्जीविरुद्ध आपल्याला इथें प्रवेश करून घ्यावा लागत आहे ह्या गोष्टीची मात्र तिला विलक्षण शरम वाटत होती. तिच्या भित्र्या डोळ्यातून ती भावना किती हृदयंगमपणें व्यक्त होत होती !

मानवी मनाचें सूक्ष्म बिनतारी संदेश कळण्याचें साधन साऱ्याच लोकाच्या जवळ नसतें. पण श्रीधरजवळ मात्र तें होतें. आणि त्या संदेशानें त्याच्या मनातली सहानुभूतीची तार छेडली. त्याला वाटलें कीं, आपण त्या बाईच्या ठिकाणीं असतों तर आपली नेमकी हीच अवस्था झाली असती. आपण असें घाबरलों नसतों इतकेंच.

तो अच्युतला म्हणाला, " जरा सरक पाहूं. होईल ह्याना इथें जागा."

अच्युत कुरकुरत सरकला आणि हलकेंच म्हणाला, " एखादी सुंदर पोरगी असती तर गोष्ट निराळी रे ! " आणि तो मोठमोठ्यानें हंसला. अगदीं एखाद्या ऐटबाज नायकासारखा.

अच्युत बोलला त्यात श्रीधरला काहीं विशेष चूक आहे असें वाटलें नाहीं. प्रत्येकाच्या मनात असले विचार येतातच. पण आपलें बोलणें त्या बाईनें ऐकूं नये अशी खबरदारी अच्युतनें घ्यायला पाहिजे होती असें मात्र त्याला वाटलें. आणि मग तो उगीचच अस्वस्थ झाला.

अच्युत मात्र बेफिकीरपणें सिगरेट ओढीत होता. पण परत श्रीधरला त्या ऐटबाज नायकाची आठवण झाली. आणि मग त्याला वाटलें कीं—छे, दुसऱ्याच्या भावनांची आपण इतकी कदर ठेवता कामा नये. आणि मग

नेहमींप्रमाणें अच्युतविषयीं एक सूक्ष्म असूयेची छटा त्याच्या मन.पटला-वरून सरकली

मागून काहींतरी त्याला टोचलें आणि एक बॅगेचा कोपरा मोटारींत शिरला. कुठचासा बायकी आवाज काकुळतीनें म्हणत होता, ‘ जरा घ्या ना ही बॅग.”

धड मागें वळतादेखील येत नव्हतें तरी श्रीधरनें तशीच ती बॅग घेतली. त्यामुळें त्याला शेजारच्या माणसाची एक शिवीदेखी खावी लागली व गंमत अशी की ती कोणीं दिली हेंदेखील त्याला कळलें नव्हतें. मग मात्र तो एकदम गोंधळला. बेफिकीर ऐटीनें वागायचें म्हणजे त्यानें ती बॅग घ्यायला नको होती.

इतक्यात मोटारीत एक तरुण स्त्री शिरली आणि तिच्याकडे पाहून श्रीधर आणि अच्युत दोघेहि चकित झाले. त्याच्या वर्गातील शीला कुळकर्णी होती ती ! व्यवस्थित, रेखीव, आकर्षक ! प्रवासातदेखील ती नीटनेटकी होती.

अर्थातच तिला मोटारींत ताबडतोब जागा मिळाली. आणि त्यानंतर लगेच मोटर सुरू झाली.

अच्युत हास्य करून म्हणाला, “ हॅलो ! ” आणि श्रीधरच्या हातातली बॅग घेऊन त्यानें तत्परतेनें तिला दिली

श्रीधरला काहीं तितक्या ऐटींत ‘ हॅलो ’ म्हणणें जमलें नाहीं. त्यानें नुसतें स्मित केलें, आणि मग त्याला उगीचच आपलें तोंड रुमालानें पुसावें लागलें.

काहींशा अबोध उत्सुकतेनें त्याचें मन थरारलें. आणि त्याला एकदम वाटलें की अशी अत्सुकता उच्युतला खात्रीनें वाटली नसावी. उत्कट भावनेचा त्याच्या मनाला सहसा स्पर्शच होत नसे. त्याच्या मनोवृत्तींतलें हें दूरत्व श्रीधरला नेहमींच विलोभनीय वाटे. त्या नायकातदेखील नेमका हाच गुण लेखकानें दाखविला नव्हता काय !

पण ह्या आगातुक विचाराला दूर सारून त्याचें मन परत शीलाभोंवतीं घोटाळूं लागलें. आणि शीला इतर मुलींहून निराळी आहे असें त्याला नेहमीं वाटे. काय असेल तें असो, ती करील तें सारें त्याला योग्यच दिसायचें. एखाद्या देखण्या, श्रीमंत चळवळया मुलाला तिनें चार तुटक शब्दांत वाटेला लावलें तरी तें बरोबरच वाटायचें, आणि एखाद्या सामान्य विद्या-

र्ध्यांशी ती मनमोकळेपणानें बोलली तरीहि त्यात कांहीं वावगें दिसत नसे. फॅशनची तिनें फारशी कदर केली नाहीं तरी तिचा पोशाख सुंदरच दिसायचा. आणि गॅदरिंगमध्यें इतर सुंदर मुलींप्रमाणें तिनें मिरविण्याची हौस भागवून घेतली नाहीं तरी तें फाजील अहंमन्यतेचें वाटत नसे. कारण नाटयप्रवेशाच्या चढाओढींत भाग घेणारा एखादा मुलगा स्त्रीपात्र मिळत नाहीं म्हणून हताश झाला असला तर त्याला मदत करायला ती चटकन् पुढें होत असे.

तिच्यातील ह्या वैशिष्टयाचें स्वरूप श्रीधरला नीटसें सागता आलें नसतें. पण एखादा कुशल लेखक त्याच्या ठिकाणीं असता तर त्यानें असें म्हटलें असतें कीं, ' तिला औचित्याची उचित जाणीव होती. '

" तू नीट बसली आहेस ना ग आई ? " शीलानें त्या बाईला प्रश्न विचारला.

" वा ! आम्हीच दिलीय् ना त्याना त्या कोपऱ्यात जागा. " अच्युत चटकन् हंसत म्हणाला.

अच्युतच्या त्या धीट चलाखीचें श्रीधरला नवल वाटलें.

शीलानें अच्युतकडे एक दृष्टिक्षेप टाकून परत आईकडे पाहिलें, व ती व्यवस्थित बसली आहे अशी खात्री झाल्यावर तिनें अच्युतकडे जरा स्थिर नजरेनें पाहून म्हटलें, " Thanks. " आणि मग तिला एकदम हंसू आलें.

शीलाशीं कांहींतरी बोलावें असें श्रीधरला वाटत होतें. पण बोलण्याचा धीर होईना. तसा वर्गात तो हुषार विद्यार्थी म्हणून समजला जाई. पण इतकेंच. कॉलेजात जिथेंतिथें पुढाकार घेणाऱ्या मुलापैकीं तो एक नव्हता. किंबहुना अशा मुलात दिसून येणारी ऐट आणि आत्मविश्वास आपल्यात नाहींत ह्याची त्याच्या मनाला नेहमी खंत वाटत असे.

ही ऐट आणि हा आत्मविश्वास म्हणजे मनोवृत्तीचा उथळपणा आणि आत्मसंतुष्टता ह्याचीं गमकें आहेत ह्याची त्याला कल्पना नव्हती.

जिमखान्यावर जाऊन हॉकी नाहीं तर टेनीस खेळ, किंवा लायब्ररींत जाऊन वाचत बस असा त्याचा कार्यक्रम असे. आपल्या खोलींत पडून

फ्लूट वाजवण्यात त्यास विशेष आनंद वाटे. आणि पुष्कळशीं मुलें आपल्याशीं उगीचच प्रेमानें का वागतात हें त्यास कधींच कळत नसे.

अच्युतनें शीलाला विचारलें, "कुठें जाणार तुम्ही?"

"बोरगावला. आणि तुम्ही?"

"तिथेच. म्हणजे आमच्याच गावाला येताय कीं तुम्ही!" अच्युत उत्साहानें म्हणाला.

"हो. तिथें मामा राहतात माझे. त्यांनीं फार आग्रहानें बोलावलें आहे म्हणून चाललोंय आम्ही. आणि तुम्ही कुठें हो चाललात, बापट?" तिनें श्रीधरकडे दृष्टिक्षेप टाकून एक स्मित करीत विचारलें.

तो म्हणाला, "बोरगावलाच. आम्ही दोघे एकाच गावचे."

"आ! आणि इतके अगदीं मन लावून काय वाचताय तुम्ही? एम्. ए. च्या अभ्यासाला तर सुरुवात नाहीं केलीत एव्हापासून?"

"छे हो! कादंबरी वाचतोंय मी. 'प्रणयरंग' फार आवडली बुवा मला."

"असें?" इतकाच प्रश्नार्थक उद्गार काढून ती थांबली. ह्या साध्या, अबोल मुलाला असल्या कादंबऱ्या आवडत असतील अशी कल्पना नव्हती तिला. त्याच्याविषयीं तिचें मन शंकित झालें.

मग संभाषणाचीं सूत्रें अच्युतनें आपल्या हातात घेतलीं. निरनिराळ्या विषयावरील आपलीं मतें छोट्या सूत्रमय वाक्यात अगदीं सहज बेफिकीरपणें सांगून टाकण्याची त्याची लकब मुलींना आकर्षक वाटत असे, आणि म्हणून तो बोलूं लागल्यावर शीला जेव्हा थोडीशी अस्वस्थ दिसूं लागली तेव्हां श्रीधरला आश्चर्य वाटलें. मात्र ह्या अस्वस्थतेचें कारण त्याच्या मनाला उलगडूं शकलें नाहीं. प्रत्येक माणसाचें मन काहीं बाबतींत आंधळें असतें. आणि श्रीधरचें मन ह्या बाबतींत आंधळें होतें.

प्रीतीदेखील अस्वस्थ करते असें त्यानें कुठल्याशा कादंबरींत वाचलें होतें आणि तिच्या अस्वस्थतेचें कदाचित् हेंच कारण असेल अशी त्याला भीति वाटली.

अच्युत निरनिराळ्या विषयावर बोलत होता. उंः! फडके ना? सामान्य रहस्यमालाचे लेखक असतात तसला लेखक—थोडी ऐट आहे इतकेंच. उंः! गांधी ना? तमोयुगातलें तत्त्वज्ञान आहे बेट्याचें! डोक्याना वनवासचें करें एवढें मात्र

साधलें आहे त्याला. युनिव्हर्सिटी आणि शिक्षण—कसल्या रुक्ष आणि अर्थहीन विषयाचा काथ्याकूट चाललेला असतो ह्या कॉलेजातून.

ह्या साऱ्या मताना विरोध करावा अशी तीव्र इच्छा श्रीधरला झाली. पण अच्युतसारख्या मुलाविषयीं त्याच्या शालीन मनात जो एक भीतीचा बंधारा होता तो ओलाडण्याचें सामर्थ्य त्या इच्छेंत नव्हतें. त्याला वाटलें कोणी सांगावे ? आपल्याहून ह्याचे विचार अधिक परिपक्व असतील; म्हणून हा इतक्या बेदरकारपणें मतें प्रदर्शित करतो.

आणि आपल्यात असा बेदरकारपणा नसावा ह्याची त्याला खंत वाटली.

श्रीधरनें हळूच ती कादंबरी उघडली, आणि तो पुढें वाचूं लागला.

"इतक्यात एकाएकीं मोटरचे दिवे गेले. मोटरनें वाकडींतिकडीं वळणें घेतलीं. ब्रेक लागल्याचा कर्णकटु आवाज झाला...शीलानें एक आर्त किंकाळी फोडली. तशी त्यानें आपल्या बलिष्ठ बाहुपाशात तिला सावरलें. तिच्या मादक केशकलापाचा स्पर्श त्याच्या मुखाला झाला. त्या धुंदींत तो म्हणाला, 'वेडे, घाबरतेस कशाला ? मी आहे ना !' ती त्याला बिलगली आणि मग त्यानीं ती रात्र प्रीतीचीं मधुर संभाषणें करण्यात घालविली. त्या उन्मत्त समयीं..."

श्रीधरच्या मनात आलें, खरेच आता असें घडलें तर ? आणि त्यानें शीलाकडे एक चोरटा दृष्टिक्षेप टाकला व तो पुढें वाचूं लागला.

मोटरचा वेग कमी कमी होऊन ती थांबली, तेव्हा श्रीधरनें चटकन् मान वर केली. सारेच परस्पराकडे आश्चर्यानें पाहात होते.

तेवढ्यात क्लीनर ओरडला, "म्हणजे ? तो महाद्या हरामखोर पेट्रोल टाकायला विसरला कीं काय गाडींत ?"

ह्या उद्गारानीं मात्र सारेच लोक थबकले. कारण तिथें आसपास पंचवीस मैल तरी पेट्रोल मिळण्याची शक्यता नव्हती. आणि आता रात्रीच्या वेळीं त्या रस्त्यानें जाणारी दुसरी मोटर भेटणेंदेखील असंभाव्यच होतें.

"अगबाई ! म्हणजे ? आता रात्र इथें घाटावरच काढावी लागते कीं काय ? शीलानें तोंडावर हात ठेवला.

आणि मग सारे लोक ड्रायव्हरला आपापल्या परीनें शिव्या देऊं लागले.

श्रीधरला मात्र एकदम मोठ्यानें हंसूं आलें. त्यामुळें साऱ्या लोकांनीं एकदम आश्चर्यानें आणि काहींशा रागाने त्याच्याकडे पाहिलें, आणि अच्युत एकदम चिडून म्हणाला, "हसायला काय झालें तुला? मूर्ख कुठचा!"

त्याच्या चिडण्याचें श्रीधरला आश्चर्य वाटलें. नेहमीं आपली मनोवृत्ति थंड ठेवणारे पुष्कळसे लोक आपल्याला त्रास झाला म्हणजे सारा थंडपणा विसरतात हें त्याला माहीत नव्हतें.

खालीं उतरल्यावर अच्युत हंसत शीलाला म्हणाला, "इतका कंटाळा आला असता अशा स्थितींत मला इथें!"

"मग आता का नाहीं यायचा?" शीलानें भुंवया चढवून विचारलें.

"तुम्ही आहात ना बरोबर."

"चला, काही तरीच!" शीला मानेला निषेधप्रदर्शक झटका देऊन म्हणाली.

"म्हणजे? खोटें वाटतें माझें म्हणणें?—"

श्रीधरला एकदम त्या कादंबरींतील अपघाताची अठवण झाली. आणि त्याला वाटलें कीं 'प्रीतीचीं मधुर संभाषणें' म्हणतात तीं हींच. निराशेनें त्याचें अंतःकरण भारावलें. छे! त्या नायकाची ऐट त्याच्याजवळ नव्हती आणि त्याच्या आयुष्यात तसल्या रम्य घटना घडण्याचा संभवहि नव्हता.

त्यानें एक सुस्कारा सोडला, आणि मग मोटार चालू होईपर्यंत तो दूर एका दगडावर जाऊन बसला.

त्याला तसा बसलेला पाहून शीलाला वाटलें, आपल्या वर्गातला हा हुषार आणि अबोल विद्यार्थी रोगट आणि एकलकोंड्या वृत्तीचा तर नाहीं?

* * *

ऊष्मा फार होत होता म्हणून शीला रात्रीं पडवींतच झोंपली होती. ती जागी झाली तेव्हा चांगलेंच फटफटलें होतें, म्हणून ती चटकन् उठून बसली.

श्रीधरचें घर अगदीं लागूनच पलीकडे होतें. तिथें गडी गाईचें दूध काढीत होता. इतक्यात श्रीधर हातात भांडें घेऊन आला आणि म्हणाला, "गणू ह्या भांड्यांत दे पाहूं दूध काढून."

गणूच्या चेहेऱ्यावर सुरकुत्या पडल्या आणि तो म्हणाला, "लहानपणीं उडवीत होतो तशा धारा उडवूं का तोंडात!"

ह्यावर श्रीधर मोठ्यानें हंसला.

शीलाच्या तरल कल्पनाशक्तीनें तावडतोब उघड्या तोंडात दुग्धधारा घेणाऱ्या एका हौशी मुलाचें चित्र काढलें आणि तिनें हंसत त्या मुलाचा गालगुच्चा देखील घेतला.

'पुरे झाला हा कल्पनेचा खेळ' असें सुचविणारी एक जाभई तिनें दिली, आणि ती उठली.

तिचा छोटा मामेभाऊ तिच्यासमोरून धावत चालला होता त्याला अडवून ती म्हणाली, "कुठें चालली स्वारी!"

"वा! आमचा दोस्त आला आहे ना? त्याला भेटायला जातों" आणि उत्तर देण्याची आपली जबाबदारी संपली असें समजून तो घाईनें पळूं लागला.

पण त्याला न सोडता ती म्हणाली, "कोण बाई हा दोस्त!"

"अग, तुझ्याबरोबरच नाहीं का तो आला!— श्रीधरदादा" तिच्या अज्ञानाचें त्याला आश्चर्य वाटत होतें.

शीलानें डोळे विस्फारले. लहान मुलाचा स्नेह संपादन करायला जी सहृदयता आणि जो वृत्तीचा ताजेपणा अवश्य असतो तो श्रीधरजवळ असावा ह्याचें तिला आश्चर्य वाटलें आणि श्रीधरविषयीं एक निराळेंच कुतूहल तिच्या मनांत निर्माण झालें.

राखुंडी घेऊन सावकाशपणें अंगणात फेऱ्या घालीत ती दांत घासूं लागली. इतक्यात श्रीधरचा आवाज आला "आजी मीच नेतों ग आज गुरं चरायला." मग गुराच्या मागोमाग श्रीधर आणि मधू डोंगर चढताना तिला दिसले. इतक्यात एक कालवड उगीचच उधळली आणि चौखूर धावूं लागली. श्रीधर आणि मधू दोघेहि कांहींसे ओरडले. आणि मग दोघांनीं एकदम परस्पराकडे पाहिलें. एकच विचार दोघांच्याहि मनात आला होता, आणि त्या दृष्टिक्षेपानें परस्पराची संमति घेऊन ते दोघे हातांतल्या काठ्या उंचावून हंसत ओरडत त्या कालवडीमागून धावूं लागले.

तें दृश्य पाहून शीलाच्या मनांत कसलीतरी प्रसन्न ऊर्मि उसळली. तिनें

चटकन् चूळ भरून टाकली, आणि धावतच घरात जाऊन ती एकदम ओरडली, " मामीऽ, चहाऽ."

मामी एकदम दचकल्या आणि म्हणाल्या, " तूंच का ही शीला ? दिवसेन् दिवस लहानच होत्ये आहेस अगदीं !"

शीलानें हंसून मान उडवली. जणुं तिला म्हणायचें होतें, ' त्यात काय बिघडलें ? कधी कधीं लहान हाणें काहीं वाईट नाहीं. '

दुपारीं जेवण झाल्यावर शीलाला काहीं उद्योग नव्हता. आणि म्हणून वाचायला एखादें पुस्तक आणण्याकरिता तिनें श्रीधरच्या घराकडे मोर्चा वळवला.

बऱ्याचशा पुस्तकाच्या पसाऱ्यात श्रीधरची स्वारी कुठेंतरी नजर लावून स्तब्ध बसली होती. शीला थोडा वेळ थाबली आणि त्याचें लक्ष वेधत नाहीं असें पाहून म्हणाली, " एखादें पुस्तक द्या कीं वाचायला. "

श्रीधरनें दचकून तिच्याकडे पाहिलें. त्याला काहींसें आश्चर्य वाटलें आणि तो म्हणाला, " घ्या ना ह्यातलें कुठचेंहि. "

तीं पुस्तकें उलथींपालथीं करीत शीला म्हणाली, " काय हा पसारा !"

श्रीधर म्हणाला, " आवरायचा आहे ना तो आता पण आधीं जरा डोक्यातले विचार आवरीत होतों. " आणि त्यानें जरा डोकें खाजवल्या-सारखें केलें.

शीलानें एकदम त्याच्याकडे पाहिलें. श्रीधर काहींसा गाधळला, आणि आपल्या बोलण्यात काहीं तथ्य आहे हें दाखविण्याकारिता म्हणाला, " आपल्या डोक्यात फार गोंधळ आणि अव्यवस्था असते, नाहीं ? "

शीला नुसती हंसली. आणि त्याच्या मांडीवर पडलेल्या Marxism–Is it Science ? ह्या पुस्तकाकडे पाहून ती म्हणाली, " मार्क्सिझम्चा अभ्यास करताय् वाटतें ? "

ज्ञानार्जनाची हौस असणें हें कॉलेजातील शिष्टसांप्रदायाच्या विरुद्ध आहे ह्याची श्रीधरला जाणीव होती. म्हणून तो काहींसा नाखुषीनें म्हणाला, " हो बुवा. "

शीला काहींशा भोळेपणानें म्हणाली, " तुम्हीं मार्क्सिस्ट् आहांत का ?"

श्रीधरला हसूं आलें. " मला वाटतें, आपण कॉलेजविद्यार्थ्यांनीं एकदम

मार्क्सिझमवर मतें देण्याचा प्रयत्न करूं नये आणि शिवाय आपल्या मताना असलीं लेबल्स् चिकटवणें मला आवडत नाहीं. त्यामुळें आपण स्वतंत्रपणें विचार करीनासे होतों."

आणि मग एकदम कसलीशी आठवण होऊन तो म्हणाला, "कंटाळा तर नाहीं आला तुम्हाला ?"

शीला म्हणाली, "छे, छे."

पण शीला गेल्यावर त्याला वाटलें कीं स्त्रियाशीं चतुर संभाषण कसें करावें तें आपल्याला कळतच नाहीं.

शीला घरीं आली ती विचार करीतच. 'डोक्यातले विचार आवरायचे आणि त्याच्यावर लेबल्स् चिकटवायचीं'—तिला एकदम हंसूं आलें, आणि ती मनाशीं म्हणाली, "लहान मुलाच्या बोलण्यात जी कल्पनाची चमत्कृति असते ती अजून ह्याच्याजवळ आहे म्हणायची.. पण त्या मानानें त्याचें विचार चागले प्रौढ दिसतात."

आणि मग आपण त्याला काहींतरीच प्रश्न विचारला ह्या जाणिवेनें ती काहींशी लाजली.

तितक्यात मधू येऊन तिला बिलगला. तेव्हा त्याचे दोन्ही गाल पकडीत ती म्हणाली, "तूं उद्या गुरें घेऊन जाशील तेव्हा मी येणार बरं का तुझ्याबरोबर."

* * *

बोरगावला इनामदारानीं एक नवीन घोडें घेतलें होते. तें कळल्यावर श्रीधरला एकदम काय वाटलें कोण जाणे ! त्यानें इनामदाराची परवानगी घेतली, आणि घोड्यावर बसायला शिकण्यातच त्याचा साग वेळ जाऊं लागला. आणि तो दोन—तीनदां पडला तरी त्याचा नाद कमी होईना. अच्युत व शीलाबरोबर तो फिरायला येई तें देखील मोठ्या मिनतवारीनें; आणि त्याचें बोलणें बहुधा त्याच विषयावर असे.

शीला अच्युतला म्हणे, "असें काय करतात तुमचे बापट ?"

अच्युत चिडून उत्तर देई, "अडाणी आहे लेकाचा ! भलत्या गोष्टींचा छंद लावून घेत असतो."

पण शीलाला मात्र त्याचें सारें लक्ष वेधून घेणाऱ्या त्या छंदाविषयीं सूक्ष्म असूया वाटूं लागली.

त्या दिवशीं फिरायला जाताना देखील श्रीधरच्या डोक्यात तसलेच विचार चालले होते

अच्युत म्हणत होता, "आज माझा एक मित्र यायचा आहे तेव्हा आपण सडकेवरूनच जाऊं या फिरत म्हणजे वाटेंत—"

पण श्रीधर मध्येंच त्याचा दंड पकडून त्याला अडवीत म्हणाला, "अच्युत, घोड्यावर बसताना आणखी एक पॉइंट असा लक्षात ठेवला पाहिजे—"

तें ऐकून अच्युतनें त्रासिक मुद्रा केली. पण शीला एकदम चिडून म्हणाली, "पुरे झालें ते तुमचें घोड्यावर बसणें! सारखा एकच छंद कसला तुमचा!"

श्रीधरला आणि अच्युतला तिच्या ह्या चिडण्याचें आश्चर्य वाटलें एकदम, आणि शीलाहि मग गोंधळली. एकदम आपल्याला इतका राग का यावा हें तिला कळेना. आणि आपल्याला असें रागावण्याचा अधिकार तरी काय असा प्रश्न तिनें स्वतःलाच विचारला तेव्हा ती अधिकच गोंधळली.

तिनें श्रीधरकडे एकदा चोरटी नजर टाकली, व परत परत रुमालानें तोंड पुसलें. आणि मग आपल्या मनोवृत्तीचा तोल अशा रीतीनें बिघडविल्याबद्दल तिला श्रीधरचा अधिकच राग आला.

श्रीधरला वाटलें, आपलें सारें चुकलें! ह्या तरुण स्त्रीचा अनुनय करायचें सोडून आपण तिच्या रोषाला मात्र पात्र झालों स्त्रियाशीं कसें वागावें तें आपल्याला कळतच नाहीं. आणि मग त्याच्या मनाला विलक्षण खिन्नता आली.

श्रीधरच्या मनातले मात्र त्याच्या चेहेऱ्यावर फार चटकन् दिसत. आणि त्याच्यातला हा फरक पाहून शीलाला कसलेंसें समाधान वाटलें.

संभाषण परत चालूं करण्याकरिता शीला म्हणाली, "आपला रिझल्ट वीस जूनला आहे ना हो?"

अच्युत म्हणाला, "हो, बुवा! आपण तर आता अभ्यासाला कंटाळलों.

सेकंड क्लास मिळाला की आपण सरळ सेक्रेटरीएटमध्यें नोकरी पकडणार. मग आपले निष्काळजीपणानें चैनींत जगताहेत."

श्रीधर आश्चर्यानें म्हणाला, "म्हणजे? एम. ए. ला जायचें नाहीं, नोकरी पकडायची, हें सारें तूं ठरवलेंस देखील? मीं विचारच केला नाहीं ह्यावर फारसा. आणि विचार केला म्हणजे असें गोंधळायला होतें! मला खूप गोष्टी कराव्याशा वाटतात, पण नक्की काहींच ठरत नाहीं. म्हणून वाटतें थांबावें, मनाची खरी ओढ कुठें आहे तें पाहावें...पण पुष्कळदां असल्या विचारात काहीं अर्थ नसतो—" आणि तो गोंधळून थांबला.

अच्युत एकदम हंसून म्हणाला, "काही तरी कल्पना करून घेतल्या आहेस तूं, श्रीधर. असा विचार करीत बसलास तर उपाशी मरशील बेट्या तूं."

शीलानें आश्चर्यानें अच्युतकडे पाहिलें. ह्या चलाख, गोड बोलणाऱ्या मुलाचें व्यक्तिमत्व इतकेंच मर्यादित कसें ह्याचें तिला आश्चर्य वाटलें. आणि तिला वाटलें कीं आपल्या साऱ्या बुद्धिमत्तेचा सारा उपयोग हा लहानसहान गोष्टींतच करतो म्हणूनच हा इतका चमकदार वाटत असावा.

श्रीधरला मात्र अच्युतचें म्हणणें खरें वाटलें. खरेंच, साऱ्या गोष्टींविषयीं इतका विचार कशाला करायचा? आणि किती गोंधळलेले आहेत आपले विचार! अच्युत किती निश्चयानें आणि आत्मविश्वासानें साऱ्या गोष्टी चटाचट ठरवीत असतो! त्याचीं मतें किती ठाम आणि निश्चित असतात! .

ह्या विचाराच्या तंद्रींत तो भलत्याच रस्त्यानें चालूं लागला तेव्हा अच्युत ओरडून म्हणाला, "ए! कुठें चालला आहेस? लहानसहान गोष्टींत देखील तुझी अक्कल चालत नाहीं वाटतें?"

आणि ह्यावर शीला एकदम म्हणाली, "पण लहानसहान गोष्टींत सारी अक्कल चालविणें हेंच मुळीं निर्बुद्धपणाचें नाहीं का?"

शीलेच्या त्या वाक्यानें श्रीधरचें मन एकदम वेधून घेतलें. जणुं तिची आणि आपली पहिल्यानेंच ओळख होत आहे अशा आशयानें त्यानें तिच्याकडे दृष्टिक्षेप टाकला. आणि मग तो तिच्याकडे पाहातच राहिला.

त्या वेळच्या साध्या वेषभूषेंतदेखील ती आकर्षक दिसत होती. तिच्या विगलित झालेल्या केशरचनेवर मावळत्या सूर्यकिरणांनीं मोठी मोहक धूसर छटा आणली होती. आणि वारा मधूनमधून तिचे केस उडवीत होता,

तें देखील तिचें सौंदर्य अधिक खुलावें अशा बेतानें. रस्ता चढणीचा होता. आणि तिनें पदर घट्ट लपेटून घेतला होता. त्यामुळें तिच्या अंगोपांगाचें सौंदर्य विशेष प्रतीत होत होतें.

मध्येंच तिनें एक निनादणारें हास्य केलें.

तें हास्य श्रीधरच्या हृदयात जाऊन खोल रुतून बसलें. इतकी गोड जखम त्याच्या हृदयाला कधीं झाली नव्हती. त्याच्या साऱ्या मनोवृत्ती फुलारल्या, उचंबळून आल्या. असीम दुःख, असीम आनंद आणि असीम आर्तता ह्याच्या विलक्षण जोरदार प्रवाहात आपण गुदमरून जात आहोंत असें त्याला वाटलें. आणि मग कसलासा वणवा भडकला तो त्याला जाळीतच सुटला.

विलक्षण निराशेनें श्रीधरचें मन दाटून आलें. त्या व्यवस्थित, रेखीव, आकर्षक मुलीनें त्याला मोहिनी घातली होती. तिला बाहुपाशात घ्यावें, तिनें आपल्या केसावरून हात फिरवावा, आणि संध्याकाळच्या उदास समयीं जे अबोध उदासवाणे विचार मनात येतात, किंवा सकाळच्या प्रहरीं जो विलक्षण उल्हास आपल्या शरिराच्या कणाकणातून ओसंडत आहे असें वाटतें, तें सारें तिला सांगायला तो किती उत्सुक झाला होता! ह्या मुलीला तें सारें समजेल अशी त्याची खात्री होती.

पण...ह्या उदास स्वयंकेंद्रित विचाराना दूर लोटण्याकरिता कांहीं तरी करणें अवश्य होतें. जवळच एका आंब्याच्या झाडावर कैऱ्या लगडल्या होत्या. त्या काढण्याकरिता श्रीधर त्यावर चटकन् चढला. आणि मग अच्युतहि वर चढला. शीलानें कैऱ्याकरिता हात पुढें केला, तेव्हा श्रीधर म्हणाला, "तुम्ही चढा कीं वर. फार सोपें आहे." आणि शीलाच्याहि मनात तसा प्रयत्न करण्याचें आलें.

तसा अच्युत एकदम म्हणाला, "तूं कोणाला काय सांगशील ह्याचा नेम नाहीं, श्रीधर. त्या कशा झाडावर चढतील?" आणि मग खालीं उतरून त्यानें शीलाच्या हातात कैऱ्या दिल्या. आणि एक रानफुलांचा गुच्छहि तिच्यापुढें करीत तो म्हणाला, "घाला ना केसात. फार छान दिसतील!"

शीलाला वाटलें दिवाणखान्यातील एखाद्या नाजुक काचपात्राप्रमाणेंच हा आपल्याला वागवितो म्हणायचा ! आणि हंसून तिनें तीं फुलें घेतलीं.

तें पाहून श्रीधरला वाटलें, अच्युतनें जिंकलें म्हणायचें—बाकी तें व्हायचेंच होतें. आणि आपलें मन त्यानें निर्धारानें दुसरीकडे वळवलें.

श्रीधर झाडावरून खालीं उतरला तेव्हां सहज त्याचा शीलाला स्पर्श झाला. तशी शीला चटकन् दूर झाली, आणि मग उगीचच तिनें श्रीधर-कडे परत परत पाहिलें.

अच्युत म्हणाला, "अजून कशी मोटर येत नाहीं कोण जाणे ! हाल होणार माझ्या मित्राचे असें दिसतें आहे." ह्यावर कोणी काहींच बोललें नाहीं.

काळोख पडूं लागला होता आणि गुरें गावाकडे परतत होतीं. दाव्या-सकट सुटून आलेल्या एका वासराच्या पायात त्याचें दावें अडकलें होतें, आणि म्हणून तें अडखळत होतें. तिघांचेंहि लक्ष त्याच्याकडे वेधलें, पण श्रीधरनें मात्र चटकन् पुढें होऊन त्याचा अडकलेला पाय सोडवला.

त्याचें तें कृत्य पाहून अच्युत हंसून म्हणाला, "अगदीं बालवाङ्मयातला शहाणा मुलगा आहेस बुवा तूं, श्रीधर!" आणि त्यानें तिरस्कारानें खांदे उडवले.

अच्युतच्या त्या वाक्यानें तिघानाहि हंसूं आलें. पण शीला मात्र फारच हंसत होती. श्रीधरचे सारे गुण पाहून जें झालें नव्हतें तें त्याच्या साधे-पणाचा हा अतिरेक पाहून झालें. त्याचें संरक्षण आपण केलें पाहिजे अशी भावना तिच्या मनात अंकुरली. श्रीधरकडे एक हक्काचा दृष्टिक्षेप टाकून ती मनाशीं म्हणाली, 'पण मोठेपणींदेखील बालवाङ्मयातला शहाणा मुलगा राहायला नैतिक धैर्य लागतें.' मात्र असें मोठ्यानें म्हणण्याचें धैर्य तिला झालें नाहीं.

तिनें नुसताच श्रीधरकडे दृष्टिक्षेप केला आणि मग ह्या विलक्षण संवे-दनाक्षम तरुणाच्या प्रीतीचा नाजुक स्पर्श आपल्याला होत आहे अशा कल्पनेनें तिचें शरीर थरारलें.

इतक्यात मोटार आली. अच्युतनें हात करून तिला थांबवलें. आणि आपला मित्र आत आहे असें पाहून तो हंसून शीलाला म्हणाला, "बरें जातों मी आता ह्याच्याबरोबर अं ?" आणि मग मोटार पुढें सरकली.

मोटारीमागें उडालेल्या धुरळ्याकडे श्रीधर शून्यपणें पाहात होता. शीलाला फुलाचा गेंद देणारा अच्युत आणि आपण ह्यामध्यें किती अंतर आहे हें त्याला स्पष्टपणें दिसत होतें. विलक्षण तीव्रतेनें त्याला वाटलें, छे ! छे ! आपण ज्या त्या गोष्टीशीं इतके समरस होता कामा नये. नको हीं तीव्र सुखदुःखें, नको हा विचाराचा गोंधळ, नको हें औत्सुक्य ! दुरून थंडपणें एखादा खेळ पाहावा तसें आयुष्याकडे पाहिलें पाहिजे. तसें पाहिलें तर आयुष्यात असें काय विशेष आहे कीं त्याविषयीं कुतूहल, कौतुक आणि आदर वाटावा ? त्यापेक्षा...पण छे ! आता फार उशीर झाला होता.

ते असह्य झालेले विचार दूर करण्याकरिता तो शीलाला म्हणाला, " बोला ना काहींतरी. " झोंपेंतून माणसानें जागें व्हावें तसें तिनें त्याच्याकडे पाहिलें. तो म्हणाला, " कसला विचार चालला होता एवढा ? "

तिनें त्याच्याकडे विचित्र दृष्टिक्षेप केला आणि मग एकदम हंसून ती म्हणाली, " काहीं नाहीं, डोक्यातले विचार आवरीत होतें, आणि त्याना लेबलें चिकटवीत होतें. "

तिला वाटलें, श्रीधर आपल्याला आता त्या लेबलावरचें नाव विचारील. पण विमनस्कपणें डोकें खाजवीत तो म्हणाला, " चुकतें खरें बुवा माझें. "

आपण त्याला दुखवलें ह्याचें शीलाला वाईट वाटलें. ती एकदम आवेगानें म्हणाली, "छे ! छे ! चुकतें कसलें ? तुम्ही आहात तसेच फार चागले आहात." आणि मग आपण एकदम काय बोलून गेलों ह्या विचारानें ती चमकली.

श्रीधरनें चमकून तिच्याकडे पाहिलें. तिच्या मनाचा संदेश त्याला समजला. आणि मग विचाराची आणि भावनाची विलक्षण गर्दी त्याच्या मनात उडाली. म्हणजे त्याचीं मूल्यें बरोबर होतीं तर—आणि अच्युतचीं चुकलीं होतीं, त्या कादंबरींतल्या नायकाचीं चुकलीं होतीं ! त्याच्या मनात असें जें नेहमी खोल कुठेंतरी वाटत असे त्याला दुजोरा देणारी एक तरी व्यक्ति होती म्हणायची ! आणि ती शीला होती.

हर्षावेगानें तो पुढें झाला. पण शीला चटकन् दूर पळाली.

आणि अशा ऐन वेळीं नायिका पळाली असती तर कादंबरींतल्या ऐटबाज नायकानें काय केलें असतें हा गंभीर प्रश्न श्रीधरपुढें पडला.

—अभिरुचि, ऑक्टोबर १९४५

# नवें जग



गॅलरींत उभें राहून त्या नव्या जगाकडे पहात असता कुसुम बिचकली, भावावली! एखाद्या गुळगुळीत पृष्ठभागावर ओरखडा निघावा तशी तिच्या मनाची अवस्था झाली

एखाद्या अज्ञान मुलानें पाटीवर रेषांची गिचमीड करून ठेवावी तशी तेथें इमारतींची दाटी होती. रस्त्यात माणसांची रीघ लागलेली होती आणि कर्कश आवाजाचा संमिश्र कोलाहल अखंडपणें चालला होता. झगझगीत जाहिराती निष्कारण लगट करीत होत्या. झकास मोटारी आणि नटलेल्या स्त्रिया नजरेंत भरत होत्या. फाटकीं किळसवाणीं लक्तरें दृष्टीसमोरून सरकत होतीं आणि पैशाचा छनछनाट येथें अविच्छिन्नपणें चालू आहे हें सारखें मनाला जाणवत होतें.

इतक्यात एका उंच ठिकाणीं बसलेल्या रुक्ष चेहेऱ्याच्या घड्याळानें ठणठणाट केला.

जणूं रागीट आजोबा खांकरले !

आणि त्यामुळें रस्त्यातील धावपळ आणि गर्दी अधिकच वाढल्याचा भास झाला.

सारखें तेंच ! घामट गर्दी ! कंटाळवाणी धावपळ !

आणि शिवाय एक माशी सारखी कुसुमच्या तोंडावर बसून तिला त्रास देत होती !

पण तिला कळत नव्हतें कीं आपल्या मनातदेखील एक प्रकारची अस्वस्थता आपल्याला असाच त्रास देत आहे.

आतापर्यंतचीं आपल्या आयुष्याचीं तेरा वर्षें कुसुमनें किती निराळ्या जगात काढलीं होतीं !

उंच निळें मोकळें आकाश आणि खडबडीत डोंगर, वात्सल्यपूर्ण भव्य वृक्ष आणि खेळकर खारी, सुबक, सालस, झोंपाळू घरं आणि नीटनेटक्या हंसऱ्या बागा, रात्रीं लुकलुकणारे दिवे आणि भुंकणारे कुत्रे या गोष्टींचें तें जग होतें.

तेथें मैत्रिणींची गडबड होती, कुशींत घेणारी आई होती आणि प्रेमळ बाबांचा रागीट चष्मा होता.

हे सारे प्रेमाचे आधार तुटून आपण कुठें तरी खोल दरींत आहोंत असें कुसुमला वाटलें, आणि एक हुंदका तिच्या कंठात दाटला !

तिला वाटलें, कशाला बाबाची लांब बदली झाली आणि इथें मुंबईला मावशीकडे शिकण्याकरिता आपल्याला ठेवलें कोण जाणे !

आणि आपल्याला असें एकाकी का वाटावें ह्याचें तिच्या मनात खोल कुठं तरी वावरणाऱ्या चेष्टेखोर, गडबड्या, आनंदी 'कुस्मी'ला आश्चर्य वाटलें.

मागें एकदा ती मुंबईला आली होती तेव्हा तिला इथें किती मजा वाटली होती !

आणि आता मात्र—पण हल्लीं तिच्या मनातच पालट होत होता. मेघानीं धुरकटलेल्या आकाशासारखी तिची मनोवृत्ति कुंद झाली होती. एखाद्या निबिड अरण्यात विचित्र भीतिदायक आवाज व्हावे, पण ते आवाज कशा-मुळें होत आहेत तें मात्र कळूं नये, त्याचप्रमाणें आपल्या मनात होणाऱ्या कसल्या तरी नव्या हालचालींची चाहूल तिला लागली होती, पण त्याचें निश्चित स्वरूप तिला कळत नव्हतें.

तिला उगीचच भीति वाटे, दुःख होई अगर आनंदाचें भरतें येई. दुसऱ्याशीं बोलताना ती चाचरे आणि दुसऱ्याच्या डोळ्याला डोळा देण्याचें तिला आता धैर्य होत नसे.

आणि धुंद वृत्तीचा एक धिप्पाड बळकट मुसलमान आपल्याला बळ-जबरीनें पळवून नेत आहे अशीं तिला स्वप्नें पडत आणि ती भयभीत होई.

त्या वेडीला कळत नव्हतें कीं, ती आता यौवनाच्या सीमारेषेवर आली होती. आणि यौवनाच्या प्रथमावस्थेत जो संकोच, जो हळूवारपणा आणि जी अंत-

मुखता वृत्तींत येते, त्यांची पुसट छाया तिच्या मनोवृत्तीवर तिच्या न कळत पडूं लागली होती. भावनांचीं विलक्षण आंदोलनें आता तिला अनुभवायची होतीं.

विचाराचा त्रास चुकविण्याकरिता कुसुम घरात गेली. तिथें मावशीचीं मुलें कॅरम खेळत होतीं. कुसुम मुकाट्यानें त्यांच्या जवळ जाऊन त्यांचा खेळ पाहात बसली. तिला वाटलें कीं, त्यांनीं आपल्याला खेळायला बोलवावें. आणि त्यांनीं जेव्हा तसें केलें नाहीं तेव्हां तिला वाटलें कीं, हीं सारीं मुलें बेपर्वा आहेत. ह्याना आपली काहीं किंमत वाटत नाहीं. आणि ह्यामुळें तिला फार विषण्णता वाटली!

संध्याकाळीं ती दिवाणखान्यात बसली होती. सहज तिनें काकांच्या टेबला-वरच्या हिरव्या मऊ आवरणावरून हात फिरवला. आणि तिच्या हाताला विलक्षण गोड गुदगुल्या झाल्या. तिनें परत परत तिथून हात फिरवला, आणि मावशीची सुधा जवळच बसली होती तिला ती उत्साहानें म्हणाली, "किती मजा वाटते ग ह्या कापडावरून हात फिरवला म्हणजे."

पण सुधेला तिच्या त्या कल्पनेंत काहीं मौज वाटली नाहीं. उलट आप-ल्याच नादात ती कुसुमला म्हणाली, "आमचे डॉक्टर काका तुला माहीत आहेत का ग?"

कुसुमनें कपाळाला आठ्या घातल्या, "कोणते काका? मला नाहीं माहीत."

सुधा आपल्याच नादात होती. ती म्हणाली, "वा! किती गंमतीदार आहेत ग ते. खादीचे कपडे घालतात, खेड्यातून हिंडतात, खूप बोलतात, हंसतात आणि कविता देखील करतात. परवाच आले होते इथें. आता परत येतील दोन तीन महिन्यानीं."

कुसुमनें आपल्या मनाचा दरवाजा घट्ट लावून घेतला. डॉक्टरांच्या विषयीं कुठल्याहि अनुकूल ग्रहाला आंत येऊं द्यायचें नाहीं असें तिनें ठरविलें.

का कोण जाणें. पण मनाला होणाऱ्या लहानसहान दुखापती सहन कर-ण्याचा तिचा कणखरपणा नष्ट झाला होता.

आणि दुसऱ्या दिवशीं शाळेंत देखील तिला असाच अनुभव आला.

मराठी निबंधाचा तास होता मास्तरनीं मुलींना विषय सुचवायला सांगितलें. कुसुमनें उल्हासानें विषय सुचविले. "चांदणी रात्र, पडका किल्ला, पाऊस."

मास्तर म्हणाले, "तसल्या विषयांवर पुष्कळ निबंध लिहून झाले आहेत. आता आपण जरा गंभीर विषय घेऊं. 'दुष्काळावर उपाययोजना.'"

तो विषय ऐकून कुसुम रागावली, अगदीं हिरमुसली झाली. तिला वाटलें किती रुक्ष हे मास्तर! किती रुक्ष ही शाळा! किती रुक्ष हें जग!

विलक्षण कडवटपणा तिच्या वृत्तींत उतरला. आपोआपच तिच्या मनाचें दार बंद झालें. नको त्या बाह्य जगाचा संपर्क, असें तिचें ठाम मत झालें.

ह्या जगात तिच्याशीं प्रेमानें वागणाऱ्या मैत्रिणी नव्हत्या. घरांत आता तिच्याकरिता कोणी मुद्दाम कोहाळयाच्या खुसखुशीत वड्या करून ठेवीत नसे. व दुधावरची साय काढून खायचा तिचा हक्क इथें मान्य होईल हें अशक्य होतें.

ह्या साऱ्या गोष्टी किती छोटया! व जगाविरुद्ध तिनें केलेल्या तक्रारी किती हास्यास्पद! पण गंमत अशी कीं, जीं माणसें एखाद्या महान् ध्येयाच्या मागें लागलीं नाहींत त्या साऱ्यांच्या जगाविरुद्ध तक्रारी अशाच क्षुद्र आणि हास्यास्पद असतात.

अशा रीतीनें कुसुम ह्या नव्या जगावर रुष्ट झाली. हें जग कठोर आणि अन्यायी आहे अशी तिची खात्री पटली. तिची वृत्ति निरुत्साही झाली. रोजच्या जीवनात तिला आनंद वाटेना. शाळेंत जायची अगर लोकांत मिसळायची आता तिला अस्पष्ट भीति वाटत असे. अशा वेळीं ती गडबडे, भांबावून जाई. ह्यामुळें लहानसहान बाबतींत देखील तिच्या हातून चुका होत. आणि मग ह्या नव्या जगाची कठोरता आणि कटुता तिला अधिकच तीव्रतेनें जाणवे. आपल्या मनाचें दार ती अधिकच घट्ट लावून घेई.

अशा रीतीनें तिच्या जीवनात एक प्रकारचा रिकामेपणा निर्माण झाला. बाहेर फिरणारें तिचें मन अंग चोरूं लागलें आणि स्वतःभोंवतींच रुंजी घालूं लागलें. स्वतःचीं छोटीं सुखदुःखें तिला फार मोठीं दिसूं लागलीं. आणि जगाचा चांगुलपणा फार लहान दिसूं लागला.

आणि तिच्या आयुष्यात निर्माण झालेल्या ह्या रिकामपणाहून अधिक असह्य दुःख तें कोणतें? ह्या दुःखातून तिच्या मनानें एक पळवाट काढली. ते आठवणींत आणि कल्पनाचित्रात गुंगून जाई. आपल्याला हवें तसें नवें जग ती कल्पनेनें निर्माण करूं लागली.

ह्या गोड स्वप्नसृष्टींत तिच्या मैत्रिणी तिला येऊन भेटत व तिच्या गळ्यात गळा घालून तिला गुपितें सागत. ती आईच्या कुशींत शिरे व वडिलाच्यावर रुसे. आणि क्वचित् तिनें वाचलेल्या कादंबऱ्यातील एखादा देखणा राजपुत्र घोडा उडवीत मोठ्या डौलानें त्या स्वप्नसृष्टींत प्रवेश करी. त्या स्वप्नाच्या गुंगींत काढलेले क्षण किती सुखदायक असत !

अशीच ती एक दिवस कांहीं मासिकाचे अंक चाळीत बसली होती. चाळता चाळता एका अंकाच्या मुखपृष्ठाकडे पाहून ती एकदम थबकली !

एक हंसरा तरुण ! पिंगट केस ! मिष्किल डोळे ! रेखीव ऐटबाज हनुवटी !

तरुणींचीं हृदयें जिंकायला जणूं त्याला चित्रकारानें निर्माण केला होता !

तिची नजर त्याच्यावर खिळून राहिली ! तिच्या हृदयाचें स्पंदन थांबलें ! श्वास अवरोधला ! सारें शरीर—साऱ्या वृत्ति बधिर होऊन गेल्या ! काल-गतीची जाणीवच हरपली ! जणूं एका उच भिंतीवरून उडी मारून पली-कडच्या रम्य प्रदेशात प्रवेश करण्यापूर्वी कालाचा घोडा क्षणभर थबकला !

आणि मग पूर्वी अस्पष्टपणेंच अनुभवलेली एक भावना तिच्या अंतरंगात उसळली आणि तींत ती पुरती गुरफटून गुदमरून गेली. पूर्वीच्या भावनेच्या पैंजणाचे छुंकार तिला क्वचित् पडद्याआडून ऐकूं येत. तिचे उत्तान नृत्य-विलास एकदम तिच्या दृष्टीस पडले कसलीशी गोड उन्मत्त शिरशिरी, सारें शरीर कंपित करून थेट मस्तकांत जाऊन भिनली, आणि बाह्य जगाची अवघी जाणीव तिनें पुसून टाकली.

मग दोन चंदेरी वस्त्रें परिधान केलेल्या पऱ्या आल्या आणि तिला उंच निळ्या स्वर्गीय वातावरणांत घेऊन गेल्या.

तिथें सुस्वर वाद्यें वाजत होतीं. हास्य निनादत होतें, उल्हासाचीं फुलें उधळलीं जात होतीं.

आणि पांढुरक्या मऊ मेघखंडावरून पावलें टाकीत तो हंसत हंसत आला आणि त्याचें कर-मीलन झालें !

ह्यानंतरचें तिचें आयुष्य म्हणजे त्या सृष्टींत निबिड भयानक अरण्यें होतीं, आणि रम्य उद्यानें होतीं, छोटीं घरकुलें होतीं आणि विलाससाधनानीं युक्त असे महाल होते. कावेबाज निर्दय खलपुरुष होते आणि तिच्या मनाच्या लहानसहान लहरी हळुवारपणें समजून घेणाऱ्या

आणि तिचे वेडे हट्ट पुरविणाऱ्या प्रेमळ मैत्रिणी होत्या. नाजुक प्रसंग होते आणि रोमांचकारी घटना होत्या.

आणि तिच्या इच्छेप्रमाणें विविध रूपें धारण करणारा तो होता.

जसजशी ती ह्या स्वप्नसृष्टींत गुरफटली जाऊं लागली तसतसें बाहेरचें जग तिला अधिक रुक्ष व कठोर वाटूं लागलें. दिनक्रमातील अगदीं साध्या गोष्टी करण्याचा देखील तिला कंटाळा येऊं लागला, कुठें जाणें नको, येणें नको, संभाषण नको, अशी तिची वृत्ति झाली. आणि अभ्यास करताना एखाद्या विषयावर मन केंद्रित करून वाचलेला मजकूर स्मरणात ठेवणें हें तर तिला विलक्षण जिकीरीचें आणि अशक्यप्राय वाटूं लागलें.

आणि दारूची धुंदी उतरेल ह्या भीतीनें जसा दारुड्या अधिकाधिक प्याले झोकतो, त्याप्रमाणें ती स्वतःला त्या स्वप्नसृष्टीच्या कोषात अधिकाधिक गुरफटून घेऊं लागली.

पण ह्या कोषातल्या बंदिस्त जीवनात देखील तिला सुख मिळेना, भावनांचीं जीं तीव्र आणि रोगट आंदोलनें ह्या स्वप्नरंजनामुळें तिला अनुभवावीं लागत, त्याचा तिच्या मनावर विलक्षण ताण पडे. सारें शरीर तप्त होई, डोकें दुखूं लागे.

तिला वाटे कीं, आपण एखाद्या धुरानें भरलेल्या खोलींत आहोंत, आणि तिच्यातून आपल्याला बाहेर पडलें पाहिजे, खिडकी उघडली पाहिजे.

अशी अस्वस्थता तिला सारखी बोंचत राही. ती नखें कुरतडीत असे, पायावर पाय चोळीत असे, आणि पुष्कळदा अभावितपणें विलक्षण वेदना झाल्यासारखा तिचा चेहरा होई.

पुष्कळदा तिच्या दिवास्वप्नात ती एका पडक्या किल्ल्यात काळ्या भयाण भुयारात अडकून पडलेली असे. आणि मग एका शुभ्र घोड्यावर स्वार होऊन तो तरुण येई, आणि तिला मोठ्या शिताफीनें सोडवून नेई.

त्याला बिलगून घोड्यावरून जात असता सारख्या थंड वाऱ्याच्या झुळका तिच्या मनाला विलक्षण आल्हाद देत. आणि घोड्याच्या दौडीमुळें तिला ज्या संवेदना होत त्या किती सुखदायक असत !

असेंच तिला कुठें तरी निसटून जायचें होतें. तिला कधीं कधीं वाटे कीं ही स्वप्नसृष्टि म्हणजे कोण एक जखीण आहे, आणि सिंदबादच्या मानेवर जसा

तो म्हातारा मनुष्य चिकटून बसला होता तशीच ती आपल्या मानेवर बसली आहे.

तिच्यापासून आपण पळालें पाहिजे. आणि तिच्या मनात खोल लपून बसलेली, चेष्टेखोर, गडबडी, आनंदी कुस्मी म्हणे, अग बाहेर चल तरी; खेळ, मजा कर, अशी काय बसतेस बावळटासारखी ?

आणि मग मोठ्या उत्साहानें ती दुसऱ्याशीं बोलण्याचा, खेळण्याचा प्रयत्न करी पण तें तिला जमत नसे, आणि मग पाण्यावर तरंगणारें लाकूड जसें भरतीच्या प्रवाहाबरोबर किनाऱ्याकडे फेकलें जातें तशी असहायपणें ती त्या स्वप्नसृष्टीकडे खेंचली जाई.

काय करावें हें तिला कळेना ! बाह्य जग आणि तिच्या कल्पनेंतलें जग ह्यांचा जो असह्य संघर्ष सतत तिच्या हृदयात चाललेला होता त्यातून मुक्त व्हायचें तरी कसें हें तिला उमजेना.

आणि पुष्कळदा तिला असें वाटे कीं, अल्लाउद्दिनाला जसा एक जादूचा दिवा मिळाला तसा आपल्याला मिळून जर आपल्या स्वप्नसृष्टीची सत्यसृष्टि करता आली तर काय बहार उडेल !

आणि अशा वेड्या कल्पनेनें तिनें मावशीचा एक जुना दिवा घासून पाहिला देखिल.

* * *

दिवस जड पावलांनीं जात होते. धुमसणाऱ्या ओल्या लाकडासारखें जीवित वाटत होतें.

अशीच एक दिवस कुसुम शून्यपणें कल्पनाचित्रें रंगवत बसली होती. इतक्यांत सुधा एक पत्र हातात घेऊन धावत आली. आपल्याला झालेला आनंद कोणाला तरी सांगावाच असें तिला वाटत होतें.

आणि म्हणून कुसुमला हलवून ती म्हणाली, “ऐकलेस का कुस्मे, अग मीं मागें सांगितलें ना, ते काका यायचे आहेत उद्या. आता इतकी मजा येईल म्हणते आहेस ! ”

आणि कुसुमवर जेव्हां त्या बातमीचा विशेष परिणाम झालेला दिसला नाहीं, तेव्हा ती धावत दुसऱ्या कोणाला तरी ही बातमी सांगायला गेली,

कुसुमला अर्थात् ह्या घटनेचें विशेष महत्त्व वाटलें नाहीं कारण तिच्या स्वप्नसृष्टींतल्या प्रेमकथेला अलीकडे नवीनच रंग भरला होता.

हंसूं नका बरं का! म्हणजे त्याचें असें झालें होतें कीं कुसुमचें हल्लीं जवाहरलाल नेहरूंवर प्रेम जडलें होतें!

आणि ही घटना किती कल्पनारम्य होती बरें!

शेवटीं एकदाचे इतके दिवस वाजतगाजत असलेले काका आले.

काळेसावळे, बळकट, हंसरे असे ते होते. आणि ते आल्याबरोबर बोलण्याचा आणि हंसण्याचा असा काहीं गलबला झाला कीं, कुसुमनें कपाळाला आठ्या घातल्या आणि ओठ घट्ट दाबले. जणुं ह्या भोंवतालच्या आनंदानें आपल्या हृदयात प्रवेश करूं नये असा तिनें कडेकोट बंदोबस्त केला.

पण ह्या गलबल्यात काकानीं तिच्या डोक्यावर मधेंच आपल्या हातातलें पुस्तक मारून विचारलें, " हें कोण नवीन पिल्लूं आणलें आहे? आणि बोलत का नाहीं ही?"

मावशी म्हणाली, " माझी भाची कुसुम. ही अबोलच आहे जरा."

काकानीं तिच्याकडे जरा निरखून पाहिलें आणि मग तेवढ्यावरच तो विषय थाबला व कुसुमनें आपल्या मनाशीं अशी नोंद केली कीं हे काका देखील इतरासारखेच बेफिकीर आहेत.

पण तिचा हा अंदाज चुकला. कारण दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती इतिहासाचें पुस्तक घेऊन आपल्या स्वप्नसृष्टींत फेरफटका मारीत असता काकानीं तिच्या पाठीवर एकदम थाप मारली आणि ते मोठ्यानें हंसून म्हणाले, " तूं खूप बोलकी आहेस कीं "

कुसुम त्याच्याकडे आश्चर्यानें पहात राहिली. हंसत हंसत ते म्हणाले, " पण तूं स्वतःशींच बोलतेस इतकेंच."

कुसुमच्या मनाचें दार किलकिलें झालें. आणि एक थंड वाऱ्याची झुळूक आत आली.

ती एकदम उल्हासानें म्हणाली, " तुम्हाला कसें समजलें?"

काका म्हणाले, " तूंच सांगितलेंस कीं."

" मीं? केव्हा?"

" कालपासून सांगते आहेस. माझ्याजवळ एक रेडिओ आहे. त्याच्या-वर दुसऱ्याच्या मनातले सगळे विचार ऐकायला येतात."

कुसुमला ती रेडिओची कल्पना आवडली.

काका म्हणाले, " तूं फार आप्पलपोटी आहेस. स्वतःशीं एवढें गोड गोड बोलतेस तें लोकाना का नाहीं सांगत ? "

आणि जाता जाता त्यानीं आपल्या हातातलीं संत्र्याची फोड तिच्या तोंडात खुपसली.

त्याच्या त्या क्रियेनें कुसुमच्या मनात खोल लपून बसलेली चेष्टेखोर, बडबडी, आनंदी कुस्मी जागृत झाली, आणि खूप मोठ्यानें हंसली.

काकाच्या त्या बोलण्यानें आणि वागण्यानें कुसुमच्या अवेदनाक्षम मना-वर फार परिणाम झाला.

तिची स्वप्नसृष्टींतील भाषा हे काका सत्यसृष्टींत वापरत होते. तिचें मन त्याना समजत होतें आणि त्यामुळें तिचें त्याच्याकडे फार लक्ष वेधलें. सतत स्वप्नरंजनात गुंग असलेली कुसुम, त्याच्या हालचालींकडे, बोलण्याकडे लक्षपूर्वक पाहूं लागली.

तिची स्वप्नसृष्टि आणि सत्यसृष्टि ह्यामध्यें जी अभेद्य भिंत उभी झाली होती, तिच्यात एक छोटासा झरोका उघडला गेला आणि पुष्कळ दिवस अंधारकोठडींत राहिलेल्या कैद्याप्रमाणें ती त्या झरोक्यातून सारखी बाहेर पाहूं लागली.

संध्याकाळीं काका गॅलरींत एकटेच उभे होते. कुसुम बराच वेळ त्याच्याकडे पहात राहिली. आणि मग एकदम एक विचार तिच्या मनात आला.

तो बोलून दाखवावा कीं न दाखवावा ह्या बाबतींत तिच्या मनात मोठा संग्राम झाला. कारण दुसऱ्याशीं मोकळेपणानें बोलण्याची तिची संवयच अलीकड नष्ट झाली होती.

पण त्या विचाराला नेटानें बाहेर ढकलायचें तिनें ठरविलें आणि काकाच्या शेजारीं जाऊन ती एकदम म्हणाली, " आता तुम्हीं देखील स्वतःशीं बोलताय् कीं ! "

काकानीं एकदम तिच्याकडे पाहिलें आणि ते म्हणाले, " वा मी खूप बोलतों कीं स्वतःशीं. पण स्वतःविषयीं मात्र बोलत नाहीं. तूंच पहा कीं !

आपण म्हणजे किती छोटें, क्षुद्र, मर्यादित! जग किती मोठें विचित्र गमतीदार आहे बरें? मग आता सांग बरें स्वतःविषयीं विचार करायचा कीं जगाविषयीं?"

कुसुमला हें बोलणें नवीन वाटलें पण ती भाषा मात्र तिचीच होती आणि ती म्हणाली, "एवढे गमतीचे आहेत म्हणता तुमचे विचार?"

"वा! फार गमतीचे! हें जग म्हणजे एक मोठें राक्षसांनीं, आणि हिंस्र पशूंनीं भरलेलें अरण्य आहे. अज्ञान, दारिद्य, रोगराई! केवढे भयंकर राक्षस आहेत हे! ह्यांच्याशीं मी आणि माझे मित्र खूप लढाया करतों. आम्हाला खूप जखमा होतात पण म्हणून आम्हीं मागें हटतों कीं काय? छट, आमचें पाऊल सदा पुढेंच असतें......"

कुसुमला हे सारे विचार नवे, चमत्कारिक वाटले. देशसेवा, लोकसेवा केली पाहिजे असें तिनें पुष्कळदा वाचलें होतें पण सर्व ठिकाणीं ही सेवा म्हणजे एक मोठें खडतर कंटाळवाणें व्रत आहे असेंच सांगितलें होतें पण ह्या काकाना मात्र ही सेवा म्हणजे एक मोठी साहसयुक्त रोमांचकारी लढाई वाटावी ह्याचें तिला आश्चर्य वाटलें.

काकांनीं तिच्या गोंधळलेल्या चेहऱ्याकडे पाहिलें आणि ते म्हणाले, "तुला पटत नाहीं ना माझें म्हणणें? वेळ लागेल थोडा पटायला. पण मीं म्हणतों तें अगदीं खरें आहे."

आणि जणुं तो गंभीर विषय बंद करण्याकरितां तिच्या पाठींत जोरानें थाप मारून ते हंसले.

मानवी जीवित म्हणजे एक मोठी विचित्र गुंतागुंत आहे. त्यांत नीति आणि अनीति, प्रीति आणि वासना, शरीर आणि मन, पवित्र आणि ओंगळ ह्यांचीं फार जवळचीं नातीं असतात. आणि त्यामुळें पुष्कळदां मोठा गोंधळ उडतो.

आताच पहा ना! आतापर्यंत काकांच्या बोलण्यानें जें झालें नव्हतें तें त्यांनीं तिच्या पाठींत थाप मारल्यामुळें झालें. त्या थापेमुळें तिच्या शरीराला कसल्याशा गुदगुल्या झाल्या. आणि एखादा वणवा भडकावा त्याप्रमाणें तिची स्वप्नसृष्टि जागृत झाली. आणि त्यांत नायकाचें स्थान मिळालें तें त्या काकाना!

आणि ह्या घटनेमुळें कुसुमच्या जीवनात मोठी गमतीदार उलथापालथ झाली. तिची स्वप्नसृष्टि आणि सत्यसृष्टि ह्यात विलक्षण जवळचें नातें निर्माण झालें.

आणि त्यानंतर एखाद्या उपासमार झालेल्या माणसानें सारखें खात सुटावें तशी तिच्या मनाची अवस्था झाली.

तिच्या प्रिय व्यक्तीचें बोलणें, लहानसहान हालचाली, मनोवृत्तीच्या लहानसहान छटा, ह्या साऱ्या गोष्टींकडे ती फार सूक्ष्मपणें पाहूं लागली. तिच्या आजूबाजूच्या सत्यसृष्टींत घडणाऱ्या घटनामुळें तिला आनंद होऊं लागला, दुःख होऊं लागलें, मत्सर वाटूं लागला.

आणि मनोवृत्तीचीं हीं आदोलनें जरी त्रासदायक होती तरी कोंडमारा करणारीं अगर गुदमरून टाकणारीं नव्हतीं.

आणि इतकेंच नव्हे तर काकाशीं बोलण्याकरिता आणि त्याच्याजवळ असण्याकरिता ती विलक्षण धडपड करूं लागली. ह्याकरिता तिला किती तरी छोटयामोठया युक्त्या सुचूं लागल्या.

आणि ह्या साऱ्या गोष्टींमुळें तिला फार मोकळें आणि निराळें वाटूं लागलें.

आपण सुंदर दिसावें म्हणून तिनें तासन् तास वेषभूषा केली, चमकदार गमतीदार बोलावें म्हणून ती सारखी बोलत आणि हंसत राहिली.

आणि शेवटीं आपण हा काय मूर्खपणा करीत आहोंत अशा विचारानें ती विलक्षण ओशाळली देखील.

पण, तरी तिचे प्रयत्न थांबले नाहींत. मोठी विसंगत आणि चमत्कारिक उपमा आहे ही. पण एखादें कुत्र्याचें पिल्लूं ज्या हट्टीपणानें तोंडात धरलेली वस्तु सोडत नाहीं, तसेंच तिचें मन ही धडपड सोडण्यास तयार नव्हतें.

आणि रात्रीं बिछान्यावर पडल्यावर जेव्हा तिची स्वप्नसृष्टि हलकेंच जागृत झाली, तेव्हा तका वेळ आपण तिला जवळ जवळ विसरलों होतों, हें कसें, असें तिला आश्चर्य वाटलें.

आणि काका ( हे आपल्या प्रियकराला हें नांव असावें हें तिला सहन

झालें नाहीं. ) तरी किती चागले होते ! किती गमतीदार आणि खरें ते बोलत !

संध्याकाळीं बागेंत फिरायला गेल्यावर ती नेहेमीं माळ्याची नजर चुकं- वून फुलें पळवीत असे, त्या दिवशीं काकादेखील तिच्याबरोबर होते.

कुसुम त्याना म्हणाली, " अशी लबाडीनें फुलें पळवायला किती मौज वाटते नाहीं ? "

काका म्हणाले, " हो वाटते तर खरीच. पण आपल्या लबाड मनाला फसवून फुलें मुळींच तोडायचीं नाहीं असें ठरविणें ह्यात तर आणखीनच मजा आहे नाहीं का ? आपली लबाडी, लुच्चेगिरी, आपलपोटेपणा ह्याना फसवणें ह्यासारखें दुसरें गमतीदार साहस नाहीं. तुला नाहीं असें वाटत ? "

त्याचें तें बोलणें कुसुमला पटलें नाहीं. पण त्याची ती भाषा तिला ओळखीची, जवळची वाटली.

आणि जणुं त्याच्यात आणि आपल्यात एक नवा दुवा जोडला गेला आहे अशा भावनेनें तिनें त्याच्याकडे पाहिलें.

तो दृष्टिक्षेप त्यानीं पाहिला आणि ओळखला आणि मग तिला अधि- कच आनंद झाला.

ह्या आणि असल्या किती तरी प्रसंगानीं तिचें मन फार उल्हसित झालें. दुसऱ्या दिवशीं ती शाळेंत गेली तेव्हा ती विलक्षण आनंदात होती. आणि तिच्या मैत्रिणींना तिचा आनंद समजू शकला नाहीं, तरी तो कमी झाला नाहीं.

ह्याचें तिलाच आश्चर्य वाटलें. आणि मग एकदम तिला असा विचार सुचला कीं, अशा लहानसहान कारणावरून आपला आनंद गमावणें म्हणजे किती वेडेपणाचें !

व इतका प्रौढ आणि शहाणा विचार आपल्याला सुचला म्हणून तिनें आपल्या डोक्याला शाबासकी दिली.

परत निबंधाचा तास होता. आणि मास्तरनीं विषय दिला ' धंदेशिक्षण. '

पण ह्यावेळेला कुसुम हिरमुसली झाली नाहीं. उलट ' धंदेशिक्षण ' ह्या रुक्ष विषयावर देखील तिनें उल्हासानें स्वतंत्र विचार प्रगट केले. धंदेशिक्षण

म्हणजे आपल्या शिक्षणक्षेत्रातील रोमाचकारी धाडस आहे अशा दृष्टीनेंच तिनें त्या विषयाकडे पाहाण्याचा प्रयत्न केला.

त्या दिवशीं संध्याकाळीं घरीं आल्यावर तिनें काकाना उल्हासानें विचारलें, "चला ! आपण जायचें ना आता फिरायला !"

ते म्हणाले, "छे ग पोरी. मला आताच तार आली आणि फार महत्त्वाच्या कामाकरिता वर्ध्याला जायचें आहे."

आणि रात्रीं ते निघून गेले देखील. जाताना ते म्हणाले, "हें पहा कुसुम, तूं स्वतःशीं बोलतेस तें मला कळवत जा बरें का. आणि मलाच का, सगळ्यानाच सागत जा कीं."

कुसुमचें मन विलक्षण विषण्ण झालें. हल्लीं थोडे दिवस तिच्यावर चेष्टेखोर, गडबड्या आनंदी कुस्मीचा फार पगडा बसला होता. पण आता परत गंभीर अबोल निरुत्साही कुसुम जगात वावरूं लागली.

फोल प्रीतीच्या ज्या काहीं वेदना असतात त्या तिनें साऱ्या सहन केल्या जी भिंत पाडली गेली होती ती परत अभेद्यपणें निर्माण झाली. निदान तिला तरी तसें वाटलें. आणि चार पाच दिवस तिनें परत स्वप्नसृष्टींतच काढले.

तिला वाटलें "संपला आपला मोकळेपणा. आता परत तेंच."

पण काहीं दिवसानीं तिच्या मनाला एकदम हलकेपणा आला. दुःख करायचें म्हटलें तरी करता येईना. काका तिला पहिल्याइतकेच आवडत होते. पण आता त्या आवडींत एक प्रकारचा मोकळेपणा, खेळाडूपणा आला. एखादें सुदर पुस्तक आवडतें तसे तिला 'काका' आवडू लागले.

पण हा फरक आपल्या मनात होत आहे हें कबूल करायलाच ती तयार नव्हती. म्हणून मुद्दाम ती गंभीर अबोल राही.

अशीच ती एक दिवस अबोलपणें बसली असता मास्तर वर्गात निबंधाच्या वह्या घेऊन आले. साऱ्या वह्या त्यानीं वाटल्या. आणि मग एक वही हातात घेऊन ते उभे राहिले, आणि खाकरून त्यानीं साऱ्या वर्गाकडे शोधकपणानें पाहिलें. आपली आवडती तपकिरीची डबी उघडण्यापूर्वी ते तिच्याकडे अशाच नजरेनें पहात असत.

ती वही आपली आहे असें कुसुमनें ओळखलें आणि ती दचकली.

मग मास्तरनीं तो निबंध वाचून दाखवला आणि स्तुतिदेखील केली त्याची.

साऱ्या मुली कुसुमकडे टकमका पाहूं लागल्या. आणि पुढच्या बाकावर बसणारी पहिल्या नंबरची मुलगी तर मागें वळून म्हणाली, " किती छान लिहितेस ग तूं " आणि त्यानतर ती जें हंसली तें तर तिच्या बोलण्याहूनहि गोड होतें.

आणि मधल्या सुट्टींत त्याची इतक्या थोड्या वेळात गट्टी जमली, आणि त्या दोघी इतक्या परस्पराच्या जवळ आल्या कीं कुसुम आपल्या मनांतले जे नाजूक विचार कोणाला बोलून दाखवीत नसे ते तिनें आपल्या मैत्रिणीला बोलून दाखविले आणि गम्मत अशी कीं ते तिला समजले.

ह्यामुळें ती आपल्या नव्या मैत्रिणींत फार रंगून गेली. इतकी कीं रात्रीं अंथरुणात पडेपर्यंत तिला आपल्या स्वप्नसृष्टीची आठवणच झाली नाहीं.

आणि रात्रीं जेव्हा तिच्या स्वप्नसृष्टींतल्या मैत्रिणी तिला भेटायला आल्या तेव्हादेखिल ती त्याच्याशीं बोलण्याऐवजीं आपल्या नव्या मैत्रिणीशीं बोलूं लागली.

तेव्हा त्या स्वप्नसृष्टींतल्या मैत्रिणी रुसून म्हणाल्या, " तुला काय बाई नवी मैत्रीण मिळाली. आम्ही जातों आता. "

तेव्हा कुसुम म्हणाली, " थाबा ना. तुम्ही देखील हव्यात म्हटलें मला, रुसूं नका गडे. "

पण ह्या गोड भांडणाचा निकाल लागायच्या आधींच झोपेची पांखर तिच्या नेत्रावर पडली.

ध्रुव मासिक, मे १९४९

## प्रिया आणि मांजर                                                                 १०

थिएटरबाहेरील दिवे झगझगत होते. मोठमोठ्या पोस्टर्सचे रंग जास्तच भडक दिसत होते. त्यावरील माणसाचे गाल जास्तच गुलाबी दिसत होते. चार आण्याच्या खिडकीवरील माणसाची केवढी तरी हुल्लड उठली होती. आणि त्यांचीं भाडणें व हास्यविनोद ह्याचा संमिश्र ध्वनि कावळ्याच्या कर्कश ओरडण्यासारखा भासत होता. बाहेर टांग्याची रीघ लागली होती. इतक्यात माणसाचा एक प्रचंड लोंढा थिएटरच्या दारातून बाहेर पडला. त्या घोळक्यात समाजाच्या निरनिराळ्या पातळींतील माणसांचें जें विचित्र मिश्रण झालें होतें तें मोठें गमतीदार होतें. त्या घोळक्यातला प्रत्येक मनुष्य अजून त्या सिनेमाच्या स्वप्नाळु, तरल वातावरणात वावरत होता; त्यातील नायकाचें धडाकेबाज अद्‌भुत शौर्य तादात्म्यतेनें आठवत होता; त्यातील नायिकेला त्या शूर नायकापासून हिसकण्याचा जोरदार प्रयत्न करीत होता. पण ही स्वप्नाळु अवस्था दीर्घकाल टिकली नाहीं. लोकाची गर्दी पांगली; विजेच्या दिव्याचा झगझगाट मागें पडून रस्त्यावरील साधा व्यवहारी उजेड मार्ग दाखवूं लागला; आणि टांगेवाल्याच्या कोलाहलानें तर स्वप्नाचा पूर्णपणें चक्काचूर केला.

विनायक मात्र अजून शुद्धीवर आला नव्हता. सव्वापांच फूट उंचीच्या त्या हडकुळ्या मवाळ मूर्तीची तंद्री अजून भंगली नव्हती. त्यानें ती सुंदर नायिका त्या नायकापासून केव्हाच हिसकावून घेतली होती, आणि आतां तो पुण्याच्या खडबडीत रस्त्यातून चालत नसून संकटांनीं व्यापलेल्या व श्वापदांनीं भरलेल्या अशा भयंकर अरण्यातून मोठ्या कौशल्यानें वाट काढीत होता. आपण एखाद्या डुकराची मुसंडी चुकवीत आहोंत अशा आविर्भावानें

तो टांग्याच्या मार्गांतून दूर झाला. एखाद्या कृष्णसर्पाचें तोंड ठेचावें अशा आविर्भावानें त्यानें तिकिटाचा कपटा चुरगाळला, आणि खलनायकाशीं आपण झुंज देत आहों ह्या आविर्भावानें त्यानें दोन लठ्ठ इसमाञ्च्या मधून वाट काढली.

पानाच्या दुकानाजवळ तो थांबला आणि आपल्या डोक्यावरची तीन ठिकाणीं वेडीवाकडी झालेली टोपी काढून त्यानें आपला मुखडा मोठ्या रुबाबानें आरशात न्याहाळला. आपले ‘ क्लोज क्रॉप ’ केलेले केस त्या नायकासारखे उलटे वळवलेले आहेत असें त्यास वाटलें आणि आपल्या दाढीचे खुंट वाढलेले चेहऱ्यावर पाहून तो अगदीं बेहद्द खूष झाला. इतक्या वेळात पानवाल्यानें पान तयार केलें. आणि तें अदबीनें विनायकच्या पुढें केलें. विनायकनें तें तुच्छतेनें त्याच्या हातातून घेतलें आणि मोठ्या नाजुकपणें आपल्या गालफाडात कोंबलें. मग आपलीं तांबडीं झालेलीं बोटें बेफिकीरपणें त्याच्या कळकट फडक्याला पुसून त्यानें त्याच्यापुढें एक बिडकी ठणकावली.

विनायक पुढें सरकला इतक्यात त्याला तुटबूट घातलेले वीरकर मास्तर भेटले. आणि त्याच्याबरोबर शाळेंतील मास्तरीण मंदाकिनी मराठे ही होती. का कोण जाणे पण विनायक वीरकर मास्तराचा द्वेष करीत असे. तसें म्हटलें तर वीरकर मास्तर मोठे मोकळ्या मनाचे आणि दिलदार स्वभावाचे गृहस्थ होते. स्वारीच्या एकदा गप्पा सुरू झाल्या कीं ऐकणारा अगदीं गुंगून जायचा. त्यामुळें प्रत्येकाला वीरकर मास्तर हवेसे वाटत. सर्वांना आवडणाऱ्या मंदाकिनी मराठेलासुद्धा ते आवडत. लग्न न झाल्यामुळें तें मोठ्या छानछोकीनें राहात असत, आणि आज ते मंदाकिनीला घेऊन सिनेमाला जाणार होते.

त्याना पाहून विनायकनें त्या नायकानें घेतलेला प्रतिकाराचा पवित्रा अभावितपण घेतला. तो पाहून वीरकर मास्तर मोठ्यानें हंसले आणि म्हणाले, “ काय बिनायकराव, आज उसाच्या रसाऐवजीं भलतीच चीज नाहीं ना घेतलीत ? ” ह्यावर मंदाकिनी मराठे अशी काहीं छद्मीपणानें हंसली कीं, विनायकच्या चेहऱ्यावरचा सर्व आविर्भाव ओसरून तो नेहमींसारखा अजागळ दिसूं लागला. विनायकची अशी नक्की समजू होती कीं, आपल्या

मनातील विचार जाणण्याची अद्‌भुत कला हिला ज्ञात झाली आहे, आणि तिचा फायदा घेऊन आपला पाणउतारा करण्याचा हिनें जणुं पणच उचलला आहे. शाळेंत तो नेहमीं तिला टाळीत असे आणि तिच्याशीं प्रत्येक शब्द तो अगदीं तोलून मापून बोलत असे. मंदाकिनीचे डोळे माजरासारखे होते. त्याची त्याला भीति वाटे !

वीरकरानीं नेहमींच्या स्वभावानुसार त्याच्याशीं अघळपघळपणें गप्पा मारावयास सुरुवात केली. विनायकला वाटलें, सिनेमातला खलनायकच आपल्याशीं बोलत आहे. वीरकर मास्तरांच्या गप्पा काहीं थांबेनात. शेवटीं मंदाकिनीनें जेव्हा त्याच्या कोटाची बाही खेचली तेव्हा स्वारी पुढें निघाली. विनायक डोळे विस्फारून मंदाकिनीच्या पाठमोऱ्या आकृतिकडे बघत होता.

* * *

लहानपणीं निरुपद्रवी म्हणून चांगलीं समजलीं जाणारीं जीं काहीं मुलें असतात त्यातील विनायक हा होता. त्यानें कधीं मोठ्या माणसांच्या मनाविरुद्ध वर्तन केलें नव्हतें. शाळेंत त्यानें कधीं दाडगाई केली नव्हती, आणि गोट्या खेळण्याचा घोर अपराध त्याच्या हातून मुळींच घडला नव्हता. आईला विचारल्याशिवाय तो कधीं घराबाहेर पडला नव्हता, त्यानें कधीं चौकसपणानें प्रश्न विचारले नव्हते, परंतु असें न करणें हा त्याचा स्वभाव नव्हता. काहीं विचित्र भीतीनें तो नेहमीं दबकून घाबरत असे आणि हें सगळें त्यानें आपल्या मर्जीविरुद्ध केलें होतें. त्याला नेहमीं वाटे कीं, आपण दाडगाई करावी, चोरून गुलकंद खावा आणि मास्तरांच्या छड्या बेदरकारपणें स्वीकारून वर्गांत कौतुकाचा विषय व्हावें.

हो ! हो ! त्याला आणखीहि एक इच्छा होती. त्याच्या घरांत एक कबरें मांजर होतें. महादुष्ट होतें तें. त्याला माहीत होतें कीं, विनायकला आपली चांगलीच धास्ती वाटते, आणि म्हणून तें त्याच्या वाटेंत मोठ्या ऐटीनें बसून राही आणि आपल्या जिभेनें पंजे साफ करीत असे. विनायकनें जर कधीं त्याच्या बाजूनें जाण्याचा प्रयत्न केलाच तर तें त्याच्याकडे तुच्छतानिदर्शक दृष्टिक्षेप टाकीत असे आणि म्हणत असे—'म्याव'. आता सांगा, इतकें झाल्यावर विनायकचा धीर

कसा टिकून राहावा ? आणि म्हणून त्याची अशी इच्छा होती कीं, त्याची मानगुट चिमटीत धरून फेंकून देता यावें. पण त्या बिचाऱ्याची ही इच्छा-देखील अपूर्ण राहिली होती.

*  *  *

तो यथावकाश बी. ए. झाला होता. दोन वर्षें बेकार राहून त्याला यथावकाश मास्तरची नोकरी लागली होती, आणि त्याच्या आईनें चादल करून एका ठेंगण्या, ठुसक्या आणि मिस्किल घाऱ्या डोळयाच्या मुलीशीं त्याचें यथायकाश लग्न लावून दिलें होतें. लग्नाला झाले होते दोन–तीनच दिवस. पण त्याच्या घरातील वऱ्हाडी मंडळींचें ठाणें औरंगजेबाच्या फौजेप्रमाणें लवकर हलण्यास नाकारीत होतें आणि अजून तो आपल्या पत्नीशीं एक शब्दहि बोलला नव्हता, किंबहुना तो तें टाळीतच होता. कारण त्याला आपल्या पत्नीच्या घाऱ्या मिस्किल डोळयाची भीति वाटत होती. खरें म्हटलें म्हणजे त्याची पत्नी फारच धीट होती. त्या दिवशीं सकाळींच ती त्याच्या अगदीं जवळून पुढे गेली होती. आणि मग मागें मुरडून तिनें आपल्या धीट घाऱ्या डोळयानीं त्याच्याकडे निरखून बघितलें होतें. विनायक तेव्हां इतका घाबरला, कीं त्यानें धोतराच्या सोग्यात आपलें नाक जोरानें शिंकरलें आणि आपल्या हातानीं डोळे झाकल्यासारखें केलें. आणि तेवढयात समोर तें माजर !

आधींच विनायकला स्टंट पिक्चर्स बघायचा नाद होता. घरांत आई आणि शाळेंत हेडमास्तर ह्याच्या दडपणाखालीं चिरडून गेलेली आपली अधिकारलालसा तो आता अशा तऱ्हेनें पूर्ण करीत असे कीं काय कोण जाणे ! मग असा रोमांचकारी प्रसंग अनुभविल्यानंतर त्यानें ' पिक्चर ' बघावें, नाहीं तर काय घरात बसून वऱ्हाडी मंडळीकडून आपले हाल करून घ्यावे ? खरोखरच फार दुष्ट माणसं होतीं तीं. आणि तें कबरें मांजर लग्नाचीं पक्वान्नें खाऊन आता फारच धीट झालें होतें. आणि रात्रीं हळूच येऊन त्याच्या अंथरुणाच्या कोपऱ्यावर झोपूं लागलें होतें.

विनायक घरीं आला आणि कपडे काढून अंथरुणावर पडला. पण त्याला झोप येईना. त्याच्या डोक्यात निरनिराळे विचार लहान मोठीं वलयें निर्माण

करीत होते. त्याच्या लहानग्या आखीव सुरक्षित जीवनात केवढी तरी खळ-बळ त्या दिवशीं उडाली होती. त्याची पत्नी, मंदाकिनी, वीरकर मास्तर, कबरें माजर आणि त्या चित्रपटातला उलटे केस फिरवलेला दणकट नायक हीं सर्व त्याच्या विचाराच्या भोंवऱ्यात पकडलीं जात होतीं आणि फेकलीं जात होतीं. शेवटीं दोन्ही हात डोक्याखालीं घेऊन आणि आपलें अंग आंखडून तो आपल्या नेहमींच्या विचित्र पद्धतीनें झोपीं गेला; आणि मग त्याला एक स्वप्न पडलें.

त्याची पत्नी एका अरण्यात मोठया वृक्षाखालीं निर्भयपणें उभी होती, आणि त्याला आपल्या घाऱ्या मिस्किल डोळयानीं बोलावीत होती. आणि त्याची काय तिच्याकडे जाण्याची इच्छा नव्हती म्हणता ? छे, छे, तो तिथें जाण्यास अगदीं उत्सुक होता. पण काय करणार ! तें बेटें कबरें मांजर नेमकें त्याच्या वाटेवर बसलें होतें. त्यानें किती वेळा शुक शुक केलें पण त्याची तेथून हलण्याची बिलकूल इच्छा नव्हती. मग विनायकाने रागानें त्या सिनेमातल्या नायकाची तलवार उच-लली-—ती तिथें कोठून आली कोण जाणे—आणि त्या माजरावर जोरानें प्रहार केला. पण तें माजर मेलें तर नाहींच; पण उलट शेपटी फुलवून त्याच्या अंगावर फिस्कारत आलें. विनायक मागें फिरणार होता, इतक्यात त्याच्या आईनें त्या माजराची मानगुट सहजगत्या चिमटींत धरून त्यास दूर भिरकावून दिलें त्यानंतर विनायकचें शौर्य परत आलें. तरवार सरसावून तो पुढें सरकला. पण पहातो तों वाटेंत वीरकर मास्तर, मंदाकिनी आणि त्याच्या वर्गातील व्रात्य कारटें बंडू पराजपे हीं उभीं होतीं आणि खदखदां हंसत होतीं. विनायकला असा चेव आला कीं, बोलून सोय नाहीं. त्यानें त्या व्रात्य बंडू परांजपेला दरडावून सागितलें, " हात पुढें कर. " आणि तरवारीनें तो त्याच्या हातावर सपासप छड्या मारूं लागला. विनायकचे वार चुकवून तें व्रात्य कारटें अदृश्य झालें तरी वीरकर मास्तर हंसतच होते. विनायक म्हणाला, " अहो वीरकर मास्तर, जरा हळू हंसा. शेजारच्या वर्गात हेडमास्तर आहेत." पण वीरकर मास्तर आपले खदखदा हंसतच होते. मग विनायकला राग आला आणि तो त्याच्यावर तरवार उगारून धावला इतक्यात मंदाकिनीनें घारे डोळे वटारून पाहिलें, त्यासरशीं

विनायकच्या हातातील तरवार खालीं पडली. तीं दोघेंहि अदृश्य झालीं आणि विनायक आपल्या घाऱ्या मिस्किल डोळयाच्या पत्नीच्या अगदीं जवळ येऊन ठेपला आणि तो—

पण इतक्यात तो मुळीं जागाच झाला. विनायकला मोठी गंमत वाटली आणि रागहि आला. अजून त्याची आणि त्याच्या पत्नीची भेट झाली नव्हती. काय करावें ? त्या वऱ्हाडी मंडळींनीं हा सगळा घोटाळा केला होता. मग त्याच्या डोक्यात आलें कीं—कीं आपल्या पत्नीचें झोपेंत चुंबन घ्यावें. कारण झोपेंत तिचे घारे डोळे बंद असणार ! किती दचकला तो आपल्या या कल्पनेनें. पण जसजसा तो विचार करूं लागला तसतसा त्याचा निश्चय दृढ होऊं लागला. त्याच्या भित्र्या मनोवृत्तीचें काहींच चालेनासें झालें आणि आपण इतके धीट झालों असें जेव्हा त्याला कळलें तेव्हा तो जास्तच खुषींत आला. मंदाकिनीला सिनेमाला घेऊन जाणारे वीरकर मास्तर, नायिकेकरिता सतरा उचापती करणारा, तो उलटे केस फिरविलेला धाडसी नायक आणि त्याचें तें स्वप्न—ह्यानीं त्याला एकच गोष्ट सुचविली. आपल्या पत्नीचें चुंबन घेणे हीच ती गोष्ट !

सर्व माणसें कशीं गाढ झोपलीं होतीं. त्याची पत्नी कोठें झोपत असे हें त्यानें मोठ्या कौशल्यानें पाहून घेतलें होतें. समजा, कोणी जागें असलें तर त्याला सागू बाहिर्दिशेला जायचें आहे म्हणून. तोच रस्ता आहे नाहीं तरी तेथें जाण्याचा ! आणि मग आपल्या निद्रिस्त पत्नीचें एक दीर्घमधुर चुंबन घ्यायचें. ती जागी होणें शक्यच नाहीं. कारण परवाच नव्हते का त्यानें कोणाला तरी बोलतांना ऐकलें, कीं त्याच्या पत्नीची झोप अत्यंत गाढ आहे म्हणून ! आणि समजा, ती जागी असली तर आपल्या अस्तित्वानें न घाबरता ती आनंदितच होणार नाहीं काय ? पण आपण तिचें चुंबन घेत असतां कोणी पाहिलें तर? शेवटल्या विचारानें त्याचा श्वासोच्छ्वास एकदम बंद झाला. त्याचा बेत अगदीं विरघळण्याच्या बेतात होता. पण अजून तो त्या चित्रपटाच्या धुंदींत होता. त्यानें विचार केला कीं कोणाला दिसणार आहे अंधारात ? आणि दिसलें तरी पत्नीच आहे ना आपली ती !

पुष्कळ वेळ विचार केल्यावर तो अस्वस्थपणें उठला. पायगतीं मांजर नाहीं असें पाहून त्याचा जीव भांड्यात पडला. मग तो हलकेंच उठला

आणि पावलाचा आवाज न करता, माणसांना न तुडविण्याची खबरदारी घेऊन चालूं लागला. पण शेवटीं त्याचा पाय एका मुलाच्या हातावर पडायचा तो पडलाच. त्याला वाटलें, आतां तें पोर कैंकाटणार. तो भेदरून निश्चल उभा राहिला. पण तें मूल नुसतें ह्या कुशीवरून त्या कुशीवर वळलें. मग त्या निद्रिस्त लोकांच्या चक्रव्यूहातून मोठ्या कौशल्यानें वाट काढून तो आपल्या पत्नीच्या अंथरुणाजवळ आला आणि त्यानें एक विजयाचा निःश्वास टाकला.

त्याची पत्नी शांतपणें झोपीं गेली होती. तिच्या गालावर तिचे केस अस्ताव्यस्तपणें चिटकले होते. झोपेंत पदर ढळल्यामुळें तिचें वक्षःस्थल मोठें उन्मादक वाटत होतें. आणि मुख्य म्हणजे तिचे घारे, मिस्किल डोळे पापण्यांनीं अगदीं शांतपणें आच्छादून टाकले होते. तो खालीं वाकणार इतक्यात धपकन् आवाज आला. पाहातो तों त्या दुष्ट कबऱ्या मांजरानें नेमकी त्याच्या पायावर उडी टाकली होती. त्यानें भेदरून उडी मारली ती थेट एका म्हातारीच्या अंगावर! त्या बिचारीची दामटीच वळली. ती मोठयानें ओरडली, 'चोर! चोर!' मग भराभर माणसें जागीं होऊं लागलीं. विनायक तर इतका घाबरला कीं, त्याला धड दरवाजाहि सापडेना. शेवटीं एकदाचा तो सांपडला. पण तो तेथून बाहेर पळणार इतक्यात त्याच्या पाठींत काठीचा एक जबरदस्त तडाका बसला. विनायक विव्हळणार होता. पण त्याच्या तोंडातून शब्दच बाहेर पडेना. उलट तो जास्तच वेगानें धावला. वाटेंत त्यानें एका बाईला अशी एक धडक दिली कीं, ती दाणकन् जमिनीवर आपटली. तिच्या आवाजावरून त्याच्या लक्षांत आलें कीं, ती त्याची मावशी होती. मग त्या गोंधळांतून त्यानें अंथरूण गांठलें आणि तो अगदीं पांघरुणात गुरफटून झोपला. थोड्या वेळानें त्याला पावलाचा आवाज जवळ येत असलेला ऐकूं आला. त्याला वाटलें भरली आपली; आली कंबक्ती; पण त्याची आई त्याला उठवायला आली होती. तिनें त्याला जोरानें हांका मारल्या आणि हलविलें देखील व तो आज्ञाधारक मुलगा तिला 'ओ' देणार होता; पण काय करणार? त्याची पाठ सणकत होती आणि त्याची दातखीळ बसली होती. शेवटीं "काय तरी मेल्याची झोप" असें पुटपुटत ती तेथून निघून

गेली. तो हलकल्लोळ केव्हा थांबला आणि त्याला केव्हा झोंप लागली तें घडसें त्याच्या लक्षात देखील आलें नाहीं.

सकाळीं जेव्हा तो उठून बसला तेव्हा घरात कोणी तरी—बहुतेक त्याची लठ्ठ मावशीच असावी—त्याच्या पत्नीला म्हणत होती "कसा बाई तरी तूं धीर दाखवून त्याला तडाका दिलास!" विनायक लक्ष देऊन ऐकूं लागला.

आता त्याच्या पत्नीचा घोगरा आवाज ऐकूं येऊं लागला. "इश्श, त्यात काय मोठंसं! आजी ओरडल्या तशी मी जागी झालें आणि पटकन् काठी घेतली हातात. काठी मारली तशी काय पण मेला पळाला!"

मावशी स्तुतीच्या स्वरात म्हणाली, "बरं तर बरं. नाहीं तर काय मेल्यानं गोंधळ घातला असतान् कोण जाणे. हो, विनायकची झोंप ही अशी आणि आमचा विनायक कीं नाहीं..."

विनायकनें पुढें लक्ष दिलें नाहीं. त्याच्या पाठीच्या वेदना त्याला जास्तच जाणवूं लागल्या. त्यानें सुस्कारा सोडून समोर पाहिलें तों तें कबरें माजर दारात बसून आपलें अंग चाटून साफ करीत होतें. त्यानें विनायक-कडे बघून आवाज काढला "म्याव्!"

सर्व दिवसभर तें घर सुनबाईच्या शौर्याच्या स्तुतीनें दुमदुमत होतें, आणि इकडे विनायकची पाठ दुहेरी वेदनांनीं ठणकत होती.

—वाङ्मयशोभा, जून १९४१

# उतूं गेलेलें दूध

११

एक भली मोठी बेरीज करताना नाना एकदम खुर्चीवरून उठले. टेबलावरच्या फायली त्यानीं झटक्यानें दूर सरकवल्या, चष्मा काढला आणि पेटींत ठेवून ती पट्टकन् बंद केली.

कसल्याशा अस्वस्थतेनें त्याच्या मनाला बोचकारलें होतें. कसला तरी त्याना फार विलक्षण कंटाळा आला होता. आणि दुसरें काहीं तरी त्याना फार उत्कटतेनें हवें होतें.

आपल्या त्या कृतीनें नाना काहींसे घाबरले. त्यानीं टेबलावरच्या फायलींना आजारून गोंजारून व्यवस्थित ठेवलें. जणुं मघाच्या दुर्वर्तनाबद्दल त्यानीं त्याची माफी मागितली.

ऑफिसमधून बाहेर पडल्यावर त्याना नेहमींप्रमाणें फिरत फिरत घरीं जावें असें वाटेना. काहीं तरी निराळेंच करावें अशी लहर त्याच्या मनात उसळली होती.

त्यानीं समोर पाहिलें तों त्याच्या ऑफिसातला तो चलाख कारकून एका गोड टायपिस्ट पोरीला घेऊन एका चकचकीत छानछोकीच्या हॉटेलमध्यें शिरत होता.

त्याना वाटलें, "छे, हल्लींचीं पोरें म्हणजे...!"

आणि मग अवचितपणें त्याचेहि पाय त्या हॉटेलकडे वळले.

हॉटेलमध्यें शिरत असताना एक शहाणा जबाबदार मित्रा आवाज त्यांना म्हणत होता, "पहा रे बुवा? आज दुपारीं तूं हॉटेलात 'मिसळ' खाल्ली आहेस, आणि आता परत हॉटेलात जाऊन उधळपट्टी करणें चागलें नाहीं बरें! ही चैनीची चटक मोठी घातकी असते..."

ह्या आवाजाच्या हुकमतींतच नाना आजपर्यंत वागत आले होते.

पण त्यांच्या मनात दुसराही एक भाडखोर आपलपोटा पण लाघवी आवाज होता. त्याची सदा कुरकुर चालू असे बेटयाची !

तो म्हणे, "नळावरून पाणी आणण्याकरिता पाच वाजता उठावें लागलें तरी चालेल, पण लठ्ठ सीताकाकूंनीं आपली बादली बाजूला सरकवता कामा नये. भाडलें पाहिजे त्याच्याशीं...निष्कारण खोलींत डोकावून कांहीं तरी खंवचटपणें बोलणारे बंडोपंत चाळींतून जागा सोडून जातील तर बरें...अळवाच्या भाजींत दुर्गावहिनींनीं काजूबिया घातल्या तर फार बहार होईल बुवा !..." आणि दुर्गावहिनी नानाकडे राहायला आल्या नव्हत्या, तेव्हा तर तो एकदा नानाना म्हणाला होता, "कंटाळा आला बुवा रोज रोज स्वयंपाक करायचा. लग्न करून टाक दुसरें..."

असा चापला होता नानानीं तेव्हा त्याला !

पण आज तो वात्रट आवाज म्हणत होता, "मग काय चुकलें होतें तेव्हा माझें ? बरोबरच सागितलें होतें मीं..." आणि नानानीं त्याच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केलें.

नाहीं तरी फारच शिरजोर झाला होता तो आज. आणि नानादेखील आज त्याच्याच बाजूचे झाले होते. इतके कीं, तो शहाणा आवाज काहींसें बोलूं लागला तेव्हा ते त्याच्यावर खेंकसून म्हणाले, "गप्प बैस रे म्हाताऱ्या ! पुरे झाली तुझी टुरटुर !"

असें कधीं ते कोणाला बोलत नसत.

नाना हॉटेलमधल्या खुर्चीवर जाऊन आरामशीरपणें बसले. तितक्यात लठ्ठ आणि भसाड्या आवाजाचे दादा साने त्याच्यासमोर येऊन बसले, आणि म्हणाले, "काय नाना ! काय म्हणतो हिटलर ?"

नाना दचकलेच एकदम आणि मग काहीं तरी बोलायचें म्हणून म्हणाले, "काय म्हणणार बिचारा ! मार खातो आहे सगळीकडून."

दादा आवेशानें म्हणाले, "इथेंच तर चुकतें तुमचें, नाना. वर्तमान-पत्रें आपलीं लिहितात आणि तुम्ही त्याच्यावर विश्वास ठेवता. अहो, ह्याच्या मागें हिटलरचा डाव आहे..."

नानाना सान्याच्या लष्करी ज्ञानाची आणि थाटाची एकंदर भीतिच

वाटत असे. आणि त्याना असेंहि कधीं कधीं वाटे कीं, आपण ह्या सान्याच्या-सारखे असतों तर आपलें आयुष्य अधिक सुखी झालें असतें.

...इतक्यात पार्टिशनपलीकडून गोड बायकी आवाज आला. " पुरे झाली बाई थट्टा "...आणि त्याना एकदम वाटलें कीं, अगदीं असाच गोड आवाज आपण अनेक वेळा ऐकला आहे...कुठें बरें ?...आणि मग सान्याचें पुढचें बोलणें त्याना ऐकूंच आलें नाहीं.

चहा पिऊन झाल्यावर बाहेर पडताना साने मागें रेंगाळले आणि नानां-नाच नेहमींप्रमाणें पैसे द्यावे लागले.

नानाच्या मनात कोणीसें उमळून म्हणालें, " हा लुच्चा माणूस नेहमींच तुम्हाला असा फसवतो. आज मुकाट्यानें बाहेर पडा तुम्ही, आणि त्याला न पडूं दे भुर्दंड "

पण नानानीं पैसे दिलेच आणि मग ते स्वतःलाच म्हणाले, "दोन चार आणे ते काय आणि त्याबाबत इतकी ओरड ती काय !"

परत कोणीसें म्हणालें, " हा पैशाचा प्रश्न नव्हे हो, पण..." नाना म्हणाले, "बरें बरें, चूप बैस आता."

हॉटेलमधून बाहेर पडल्यावर त्यानीं स्वतःलाच विचारलें, " हंऽ आता काय काम आहे बरें ? "

हो, त्याचा मामेभाऊ बराच आजारी होता त्याच्याकडे जाऊन यायचें होतें. मोठा श्रीमंत आणि कुरेंबाज मनुष्य होता तो, आणि राहात असे कुठें दूर...दादरला. पण म्हणून काय झालें ! आजारी माणसाची वास्त-पुस्त नको का करायला ? आणि म्हणून ते दादरला जाणाऱ्या बसकरिता रांगेंत उभे राहिले.

नानाना पाहून त्या मामेभावाला बरें वाटलें. त्यानें त्याचे दोन्ही हात उगीचच आपल्या हातात घेतले. नानानाहि बरें वाटलें. पण तितकेंच; त्याच्या मनात कोणीसें कुरकुरलें, " मी मागें आजारी पडलों होतों तेव्हा कांहीं हा माझ्याकडे फिरकला नव्हता."

उदासीनतेचीं अभ्रें मग जमा झालीं. आणि मग त्याना थकवा वाटूं लागला. घशाला कोरड पडली आणि वाटलें, " आतां पुरे, घरीं जाऊन स्वस्थ झोपावें म्हणजे झालें." आणि घरीं जाण्याची त्याना फार उत्सुकता

वाटायला लागली. ह्या उत्सुकतेचें त्याना आश्चर्य वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. आणि त्यानीं स्वतःला विचारलें " घरीं जाऊन काय करायचें ? "

...त्याना घरीं जाऊन उत्तम गरमागरम चहा प्यायचा होता. दुर्गावहिनींना चहा फार उत्तम करता येत असे. मनोहरला ( नानाच्या मुलाला ) नसे तो चहा इतका आवडत. पण नानाना मात्र फार आवडत असे.

नानाना आणखीही एके ठिकाणीं जायचें होतें. त्याच्या एका दूरच्या नातेवाइकाच्या मुलीचें लग्न होतें. गरीब होता बिचारा, पण मिजासखोरहि तितकाच होता. आणि मुलीच्या लग्नाकरिता त्यानें नानाच्याजवळ थोडी मदत मागितली होती.

नानाना वाटलें, " काय म्हणून करायची त्या मिजासखोराला मदत ? " पण लगेच त्याच्या ध्यानात आलें कीं, त्याच्या मिजासखोरपणाबद्दल त्याच्या मुलीला प्रायश्चित्त देणें अयोग्य होतें.

शेवटीं त्यानीं त्याला चाळीस रुपये देण्याचें ठरवलें. तसें पाहिलें तर ही मदत फारच अल्प होती. पण ह्याहून अधिक देणें नानाना परवडण्यासारखें नव्हतें. नानाना पगार होता अवघा दीडशें रुपये. आणि त्यांच्या मुलाला जरी आता नोकरी होती तरी तो आपला पगार घरखर्चासाठीं देत नसे—किंबहुना तो आपल्या पगाराचें काय करीत असे तें नानाना माहीतच नव्हतें.

नानानीं त्याच्या घरीं जाऊन ती रक्कम त्याला दिली. आणि तो आता आपले आभार मानणार ह्या कल्पनेनें त्याना आधींच ओशाळल्यासारखें झालें.

पण त्याच्या ओशाळण्याचा त्या नातेवाइकानें निराळाच अर्थ केला आणि तो धूर्तपणानें म्हणाला, " काय ? अवघे चाळीस ? तुमच्यासारख्याकडून निदान दोनशें रुपये तरी येतील अशी माझी अपेक्षा होती. आता काय खर्च आहे हो तुम्हाला ? मुलाला चागली नोकरी आहे..."

त्याच्या त्या भडिमारानें नाना अगदीं घाबरून गेले. त्याला काय उत्तर द्यावें तें त्याना कळेना. खिशातून आणखी पंचवीस रुपये काढून त्यानीं त्याच्यापुढें ठेवले आणि ते भराभर जिना उतरले.

खालीं उतरल्यावर त्याना कोणीसें भेटलें आणि म्हणालें, " काय नाना ! कुठें गेला होता ? "

नाना चाचरत म्हणाले, "तो आपला हा बर्वे हो, त्याच्या मुलीचें लग्न आहे..."

त्यावर तो मनुष्य हंसून म्हणाला, "अहो कसली मुलगी अन् कसलं लग्न. तो आपल्या बायका-पोराना हल्लीं बाळगतो आहे कुठें !

नानांना धक्काच बसला ते शब्द ऐकून आणि मग त्याना अधिकच उदासीन वाटूं लागलें. त्याच्याभोंवतीं वावरणाऱ्या साऱ्या माणसाचा त्याना विलक्षण कंटाळा आला. आणि अगदीं फार फार एकाकी वाटायला लागलें.

त्याना वाटलें कीं, "आपल्या इवल्याशा घरट्यातून चिमण्या जशा सुखानें राहतात, त्याप्रमाणें आपण माणसें ह्या छोट्या जगात का नांदूं शकत नाहीं ! कशाला ही फसवेगिरी माणसानीं करावी ? आपण आपल्या घरात स्वस्थपणें बसलें असता बंडोपंतानीं दारातून डोकावून खवचटपणें का बोलावें ?..."

तसें पाहिलें तर माणसाच्या गरजा किती थोड्या ! आणि त्याच्याकरिता कशाला इतकी धडपड आणि फसवेगिरी !

कॉंग्रेसचे लोक त्याच्याकडे मत मागायला येत तेव्हा त्याना वाटे, "हे लोक पाकिस्तान-साम्यवाद वगैरे गोष्टींचें इतकें अवडंबर कशाला माजवतात ? मला ह्या गोष्टींशीं काय करायचें आहे ? मला निवातपणें बसायला एक खोली हवी आहे. आघोळीला भरपूर पाणी हवें आहे. तादुळात दगड नको आहेत. आणखी..."

...आणखीही त्याना काहीं तरी हवें होतें; काहीं तरी उबदार, मधुर, नाजूक...उन्मादक ! जें आजपर्यंत त्याना कधीं मिळालें नव्हतें.. ज्याच्या करिता त्याचा अंतरात्मा फार तृषार्त झाला होता...जें न मिळाल्यामुळें त्याचें जीवित सुकून, कोमेजून गेले होतें—विलक्षण उदासीन झालें होतें.

आणि ही उदासीनता आपल्या वाट्याला यावी असें आपण आपल्या आयुष्यात काय केलें आहे, हे त्यांना कळेना.

त्यानीं आपला संसार सुरळीतपणें केला होता. बायको भाडायला उठली तरी ते कधीं परत बोलले नव्हते. तिची सारी कटकट त्यानीं मुकाट्यानें सहन केली होती...छट् ! पण मेलेल्या माणसाला कसलीं नावें ठेवायचीं ! आप-

त्याला पैसे मिळवायची आणि तिची हौस पुरवायची अक्कल नव्हती म्हणूनच ना ती असें करीत असे ?

सुटली होती बिचारी ! त्यानंतर आईची उणीव भासूं नये अशा रीतीनें त्यानीं आपल्या मुलाचें संगोपन केलें होतें. आणि आता तो बी. ए. होऊन नोकरीला लागला होता.

अजून त्याला समज आली नव्हती. छानछोकीची त्याला फार हौस होती आणि तिरसटपणाहि त्याच्या अंगात फार होता.

पण चालायचेंच ! लहान वयात अशींच असतात सगळीं !...तरी पण त्यानें आणखी थोडे समजूतदारपणें वागायला हवें होतें—नानाशीं नव्हे, पण निदान दुर्गावहिनींशीं

नानाचे बंधु वारल्यावर दुर्गावहिनींनीं दोन वर्षे अनेक हालअपेष्टा सहन केल्या होत्या, आणि आता त्या नानाच्या आश्रयाला आल्या होत्या. त्याना लहानसहान गोष्टींवरून वाटेल तसें बोलून त्याच्या आश्रितपणाची सारखी जाणीव करून देणें म्हणजे किती हलक्या मनोवृत्तीचें होतें !

त्या कल्पनेनें नाना स्वतःच फार शरमले आणि त्यानीं हातात तोंड लपविल्यासारखें केलें.

आणि दुर्गावहिनी किती चांगल्या होत्या ! घरातले सगळें काम त्या फार व्यवस्थितपणें करीत. नुसत्या व्यवस्थितपणें नव्हे, तर विलक्षण आस्थेनें व आपुलकीनें. नानाचें आवडतें ओल्या मिरचीचें तिखट हल्लीं वारंवार त्याच्या पानात पडत असे. भाकरीबरोबर लोणी मोठ्या आस्थेनें वाढलें जाई. आणि रात्रीं ताक प्यायल्यामुळें नानांना खोकला होतो हें ओळखून त्याचें ताक पिणें बंद केलें होतें तें दुर्गावहिनींनींच !

नानाना आठवण झाली कीं दुर्गावहिनींचीं लुगडीं फाटलीं आहेत. आठ दिवसापूर्वीं त्यानीं पंचवीस रुपये दुमत्याच्या कपाटावर ठेवून म्हटलें होतें, " हे तुमच्या लुगड्याना." पण दुर्गावहिनींनीं अजून लुगडीं आणलीं नव्हतीं. जुनींच त्या शिवून वापरत होत्या

नानाना वाटलें —नव्हे ते चटकन् दुकानात शिरले आणि त्यानीं दोन पातळें खरेदी केलीं. तीं पातळें कागदात गुंडाळलीं जात असतां त्याच्या एकदम ध्यानात आलें कीं, तीं पातळें फार आधुनिक आणि फॅशनेबल होतीं.

एकदम भीतीच वाटली नानाना! पण 'पातळे बदलून द्या' असें दुकानदाराला सांगायचा कांहीं त्याना धीर झाला नाहीं. इतके ते भिडस्त होते.

थोडें पुढें गेल्यावर त्याना आठवण झाली कीं हो! घरात खोबरेल तेल नव्हतें. आणि मिळतहि नव्हतें तें बाजारात. अर्थात् त्यामुळें त्याची स्वतःची अडचण होत नसे म्हणा, पण दुर्गावहिनींची किती अडचण होत असेल! बरें, त्या स्वतः कधीं कांहीं मागायच्या नाहींत.

परत ते दुकानात शिरले. दुकानदारानें भराभर त्याच्यापुढें निरनिराळ्या बाटल्या ठेवल्या आणि किंमती सांगितल्या.

नाना साधारणपणें स्वस्त, साध्या, टिकाऊ वस्तू खरेदी करीत. आणि तसेंच ते तेव्हा करणार होते. पण का कोण जाणे, एका निळ्या कागदात गुंडाळलेल्या सुरेख बाटलीकडे त्याचें लक्ष फार वेधून राहिलें

दुकानदार ती बाटली उचलीत म्हणाला, "ही देऊं का?"

नाना एकदम म्हणाले, "हो."

आणि झालें! सणसणीत तीन रुपये नानाना द्यावे लागले

मग मात्र त्याना त्या दुकानदाराचा फार राग आला. "लुच्चा कुठचा. उगीच महाग वस्तु गळ्यात बांधतो"

आपलें पातळाचें पुडकें घेण्याकरिता म्हणून ते वळले, तों एक तरुण आकर्षक मुलगी तें पुडकें उलगडून पाहात असलेली त्याना आढळली. त्या मुलीच्या धिटाईनें ते विलक्षण चकित झाले.

ती मुलगी त्याच्याकडे पाहून हंसत म्हणाली, "माफ करा हं. बाजूनें काठ दिसले ते आवडले म्हणून उलगडून पाहिलें. किती छान रंग आहेत हो." आणि मग भुवया उचावून त्याच्याकडे पाहात ती म्हणाली, "तुम्हींच केलीत ही निवड?"

नाना घाबरून म्हणाले "हो, का!"

ती मुलगी म्हणाली, 'फार छान आहे, तुम्हीं पातळाचें दुकान काढलेंत तर सगळ्या बायका तुमच्याकडेच येतील खरेदीला."

त्या मुलीचें तें बोलणें नानाना फार आवडलें. त्याना वाटलें, जगातलीं सगळींच माणसें नेहमींच असें गोड का बोलत नाहींत?

आणि त्या मुलीच्या गौरवर्ण नाजुक मानेच्या हालचालीवरून दृष्टि दूर

करताना त्याना वाटलें कीं, मानेची अशी मोहक हालचाल आपण ह्याच्या-आधीं पाहिलेली आहे.

नाना बाहेर पडले तेव्हा स्वतःवर विलक्षण खूष झालेले होते. आपण कांहीं तरी विशेष गोड नाजुक काम केलें असें त्याना वाटत होतें. आणि खोडी केल्यावर जसें एखाद्या लहान मुलाला हंसूं येतें तसें त्यांना हंसूं येत होतें. व नंतर त्यांनीं भाजी घेतली तीदेखील कॉली फ्लॉवरची.

चाळीच्या दाराशीं आल्यावर मात्र ते एकदम चपापले. त्याना कसलीशी अस्पष्ट भीति वाटली—खवचट बंडोपंताची आणि दुर्गावहिनींची देखील.

खवचट बंडोपंत जणुं त्याची वाटच पाहत उभे होते.

नानाच्या हातातल्या सामानावर झडप घालीत ते म्हणाले, "ओहोहो, केवढी खरेदी ही नाना ! ऑ, हें काय ? पातळ वाटतें ? कोणाला हीं ? सूनबाई येणार म्हणून ही तयारी कीं काय ? अहो, पण मुलगा कुठें विचारतोय तुम्हाला ? अं ? कीं दुर्गावहिनींच्याकरिता आगलीं आहेत हीं ? बाकी तुम्हीं बिनबोलकीं माणसें काय कराल ह्याचा नेम नाहीं ..ऑ ऽ आणि ही फक्कड तेलाची बाटली कशाला बुवा ? आता केस पिकायला लागल्यावर हो कशाला हे ढंग ?... "

नाना संतापानें नुसते थरथर कापत होते पण बंडोपंताना एखादें सणसणीत उत्तर देणें कांहीं त्याना जमेना, आणि त्याच्या तावडींतून सुटून जेव्हा नाना घरात आले तेव्हा ते नुसते घामानें डबडबून गेले होते.

ते मटकन् खुर्चीवर बसले. इतके ते खचून गेले होते. इतक्यात त्याची समोरच्या कॅलेंडरकडे नजर गेली. आणि एकदम त्याच्या ध्यानात आलें कीं, धान्याचें रेशन आणायचा तो शेवटचा दिवस होता. छे, आता उठून परत ती दगदग करायची त्याच्यात धमक नव्हती

इतक्यात कपडे करून बाहेर पडताना त्याचा मुलगा त्याना दिसला. त्याला ते भीत भीत म्हणाले, "हें पहा मनोहर जरा तेवढें रेशन घेऊन ये रे. मी दमलोय् बघ अगदीं." मुलानें कपाळाला आठ्या घातल्या आणि तो म्हणाला, "वा ! म्हणजे मीं फिरायला निघालों आहें आणि तुम्ही मला सांगा भलतेंच. मला नाहीं आता वेळ..."

"अरे पण..."

" हें पाहा नाना, तुम्ही मला असलीं हलकीं कामें सांगत जाऊं नका. म्हणे झाडूवाल्याला हाक मार, रेशनच्या पिशव्या हमालासारख्या डोक्यावर घेऊन ये. मी आता लहान नाहीं, समजलात ? "

" अरे पण मी देखील नाहीं का करीत असलीं कामें."

" तुम्हाला असेल तसली संवय. मला नाहीं तें जमायचें " आणि तो चालता झाला.

नाना हतबुद्धपणें त्याच्याकडे पाहात राहिले. ज्याला त्यानीं अविश्रांत श्रम करून शिकवलें, मोठें केलें, त्याचे हे प्रताप होते. जगात त्याचा कोणावर हक्क नव्हता, अधिकार नव्हता. कोणाला त्याची किंमत नव्हती.

विलक्षण कटुता त्याच्या अंतःकरणात दाटली. खोल अंधारलेल्या गर्तेत आपण चाचपडत आहोंत, असें त्याना वाटलें.

...आणि एखाद्या खवळलेल्या नागिणीनें फडा उभारावी, तशी एक विलक्षण चीड त्याच्या मनात उफाळली. त्याना वाटलें कीं, एक जोडा घ्यावा आणि जो दिसेल त्याचें मुस्कट फोडावें, सगळ्या जगाला पायदळीं तुडवावें, काय वाटेल तें करावें...

...आणि काय करावें हें न समजल्यामुळें त्यानीं स्वतःच्याच एक फाड् दिशीं तोंडात मारून घेतली. त्याना असा तीव्र उमाळा आला कीं, एखाद्या लहान मुलासारखें कोणाच्या तरी कुशींत शिरून स्फुंदून स्फुंदून रडावें.

ते टेबलावर डोकें टेकून स्वस्थ बसले.

इतक्यात हलकी चाहूल लागली आणि एक गोड आवाज आला, " चहा घेणार ना ? "

हा—हाच तो गोड आवाज. ह्याचीच आठवण त्याना त्या हॉटेलमध्यें झाली होती.

त्यांनीं वर पाहिलें तों दुर्गावहिनी दारात उभ्या होत्या. नाना वेड्यासारखे त्यांच्याकडे पाहात राहिले.

दुर्गावहिनी मान खालीं घालून म्हणाल्या, " त्याचें काय एवढें मनाला लावून घेता ! लहान वय आहे म्हणून बोलतो असें. मोठा झाला म्हणजे..."

नाना भाडखोरपणें म्हणाले, " पण काय म्हणून ? "

दुर्गावहिनी हंसून म्हणाल्या, " मी सांगतें म्हणून. "

आणि मग एखाद्या आज्ञाधारक मुलाप्रमाणें नाना त्यांच्या मागोमाग घरात गेले.

दुर्गावहिनींनीं चटकन् पाट ठेवला. आणि नाना जेव्हा चहा बशींत ओतून स्वस्थ बसले तेव्हा त्या म्हणाल्या, " थाबा हं. मीं निववून देतें."

आणि त्यांच्या त्या शब्दानीं नानांच्या मनातले भावनाचे कढदेखील निवले. आणि त्याना भीति वाटली कीं, त्या तापलेल्या भाड्यामुळें दुर्गावहिनींचीं बोटें भाजतील—नाजुक, निमुळतीं आणि लालसर होतीं तीं. तीं हातात धरून हळुवारपणें कुरवाळावीं असें नानाना वाटलें.

आणि गंमत अशी कीं, आपल्या त्या कल्पनेचें नानाना आश्चर्य वाटलें नाहीं. उलट आपल्या मनाची इतकी तयारी झाली तरी कधीं ह्याचेंच त्याना आश्चर्य वाटलें.

इतक्यात दुर्गावहिनी म्हणाल्या, " त्या टोपलीखालीं कलिंगडाची फोड आहे. दुपारीं शेजारच्या बनूताईनीं दिली. तुम्हाला आवडते म्हणून ठेवली..."

नाना आश्चर्यानें त्यांच्याकडे पाहात राहिले. म्हणजे त्याना ह्या जगात किंमत होती तर ! त्यांच्या लहानसहान आवडीनिवडी पुरविण्यात देखील कोणाला तरी आनंद वाटत होता तर ! त्यांच्या सुखदुःखाशीं तद्रूप व्हावें असें कोणाला तरी वाटत होतें !

हें सारेंच किती वेगळें अननुभूत होतें ! सुखदायक संवेदनानीं त्याचें शरीर पुलकित झालें. एका नाजुक भावनेचें कारंजें त्यांच्या हृदयात थुइथुइ नाचूं लागलें, आणि भोंवतीं इंद्रधनुष्यानीं फेर धरला.

त्यांच्या हृदयातील सारी खिन्नता, सारें औदासिन्य त्या कारंजाच्या धारांनीं धुऊन निघालें. एकाकीपणाचा अंधार लोपला आणि स्नेहमय प्रकाशानें मनःपटल उजळलें.

इतकी सुखदायक मनःस्थिति नानानीं कधीं अनुभवली नव्हती. आतां त्याना मुलाच्या गडबडीचा त्रास होत नव्हता. गाड्यांच्या खडखडीची कटकट होत नव्हती. बंडोपंताच्या खवचटपणाची भीति वाटत नव्हती. मुलाच्या बेफिकिरीची पर्वा वाटत नव्हती. आपलें दारिद्र्य आणि दुर्दैव ह्याच्याविषयीं खेद वाटत नव्हता.

ह्या सान्या गोष्टींच्या आणि त्यांच्या मध्यें जणूं एक विलक्षण सामर्थ्य-शाली शक्ति उभी होती.

आणि विलक्षण स्निग्धतेनें त्यांचें मन काठोकाठ भरून आलें. त्यांच्या खिडकींतून दिसणारा आकाशाचा इवलासा तुकडा, कुठल्याशा इमारतीच्या भिंतींत उगवलेलें आणि आपलीं लाल पानें डौलानें हलवणारें वडाचें झाड, खिडकीच्या दारावर बसलेली चिमणी, फार काय, त्यांच्या समोरील बहाच्या कपावर असलेली अस्पष्ट गुलाबी छटा ह्या सर्वोविषयीं त्यांना विलक्षण स्निग्धता वाटूं लागली.

कसल्याशा प्रेरणेनें नाना उठले आणि बाहेरून त्यांनीं तें पुडकें आणि ती बाटली आणली. आणि त्या बाटलीवरच्या निळ्या कागदी आवरणाकडे पाहात ते म्हणाले, " असल्याच एका कागदाकरिता मी लहानपणीं एका मुलाबरोबर खूप भांडलों होतों.

ते हंसले. दुर्गावहिनीदेखील हंसल्या.

जहाज किनाऱ्याजवळ आलें म्हणजे नाळीवरचा खलाशी जशी एक दोरी भिरकावतो, तसें काहींसें झालें.

दुर्गावहिनी म्हणाल्या, " कशाल्या आणली ती बाटली ? " नाना डोकें खाजवीत म्हणाले, " हल्लीं खोबरेल मिळत नाहीं. म्हणून म्हटलें असावी एक घरांत. मला लागते मधून मधून... "

नानांनीं बाटली का आणली होती तें दुर्गावहिनींना समजलें. आणि त्यांना तें समजलें, हें नानांच्याहि ध्यानात आलें.

पण कोणींच काहीं बोलले नाहीं. मग दुर्गावहिनी म्हणाल्या, " आणि हें कोटाचें कापड वाटतें ? "

नाना पुडकें उघडीत म्हणाले, " छे, हीं पातळें आणलीं आहेत. "

नारळ खरवडताना दुर्गावहिनी एकदम थांबल्या, त्यांचा कंठ दाटून आला. श्वासोच्छ्वास वेगानें होऊं लागला आणि त्या म्हणाल्या, " फुटक्या नशिबाची मी. कशाला माझें इतकें करतां ? "

त्या उठून खिडकीजवळ जाऊन उभ्या राहिल्या आणि पदरात त्यांनीं आपलें तोंड लपवलें.

नानांचें हृदय दाटून आलें आणि तितक्यात असेंहि त्यांच्या ध्यानांत

आलें कीं, दुर्गावहिनींची मान त्या दुकानात भेटलेल्या मुलीच्या मानेसारखीच नाजुक, गौरवर्ण आणि मोहक आहे.

ते चटकन् उठून त्यांच्याजवळ गेले, त्याना खूप बोलायचें होतें. पण ते शेवटीं इतकेंच म्हणाले, "आपण दोघेंहि कमनशिबी नाहीं का? आपण परस्पराना नाहीं संभाळायचें तर कोणीं संभाळायचें?"

तरी त्या हुदके देतच होत्या. नानाची मनःस्थिति विलक्षण विकल झाली. दुर्गावहिनींचें दुःख हलकें करण्याकरिता ते काय वाटेल तें करायला तयार होते. पण त्याना काहींच करता येत नव्हतें.

आणि त्या गोंधळलेल्या मनःस्थितींत काहीं तरी करायचें म्हणून त्यानीं दुर्गावहिनींच्या खांद्यावर हात ठेवला.

अंगातून लखलकन् वीज गेल्यासारखें नानाना वाटलें. आपण काय केलें ह्याचा अर्थ त्याना कळला, आणि वावटळींत एखादें चिमकुलें पीस फडफडावें तशी त्याची अवस्था झाली. एका प्रचंड लाटेखालीं सापडून आपल्या चिंधड्या होत आहेत असें त्याना वाटलें.

तरी पण आपला एकाकीपणा आणि औदासीन्य नष्ट करणारी ही दिव्यौषधी आपण हातची सोडता कामा नये, असें त्याचें मन त्याना आक्रंदन करून सांगूं लागलें.

हजारों बंडोपंत खोलींत डोकावून खवचटपणें बोलले असते, मुलगा घर सोडून चालता झाला असता, काय वाटेल तें झालें असतें तरी ते तो हात काढणार नव्हते.

आणि हा निश्चय करताना त्याना दरदरून घाम फुटला.

इतक्यात कुठेंसा कसलासा आवाज झाला. कबुतर फडफडलें असावें.

नाना एकदम दचकले. त्याचा हात खालीं आला आणि ते बावचळल्यासारखे इकडे तिकडे पाहूं लागले.

इतक्यात दुर्गावहिनी एकदम भानावर आल्या. चुलीकडे त्यांचें लक्ष गेलें आणि धावत जाऊन त्यानीं उतूं जाणाऱ्या दुधावर सपकारा मारला.

वर आलेलें दूध एकदम खालीं गेलें आणि नानाच्या हृदयांतहि एकदम तसेंच काहींसें झालें.

—वाङ्मयशोभा, जुलै १९४६

१ मानस.

## बाई शाळा सोडून जातात ... १२

आईची कात्री घेऊन मी बाबाच्या पाढऱ्या कागदाचें बदक कापत होतें. इतक्यात मधूनें माझा शेपटा ओढला. मी मधूवर कात्री उगारली. पण तो मला एक नळकाडी दाखवून म्हणाला, " ही बघ गंमत. "

मीं म्हटलें, " अय्या ! हें आईचें थर्मामिटर. ठेवून दे पाहूं."

मधू म्हणाला, " हो ग. ठेवूं सावकाश. आपण ह्यानें खेळूं या. तूं हो आजारी. मी होतों डॉक्टर. "

मीं नको म्हटलें. पण मग पलंगावर जाऊन झोपलें. मधूनें माझ्या खाकेंत थर्मामिटर घातलें, आणि म्हणाला, " घट्ट दाबून ठेव. नाहींतर त्याच्यात ताप भरायचा नाहीं. " मग थोडा वेळ मधूनें माझें डोकें तपासलें आणि म्हणाला, " दात किडके आहेत. दररोज नीट धू. " तशी मी म्हटलें, " तुझेच आहेत. " मी त्याला मारणार होते. पण थर्मामिटर पडले असतें म्हणून...

मधू थर्मामिटर काढायला लागला. मीं हात लावून पाहिला तर थर्मामिटर गारच होतें. मीं मधूला म्हटलें, "अरे त्यात ताप अजून भरायचा आहे."

" तुला काय कळतें ! " म्हणून तो थर्मामिटर ओढायला लागला. मी घट्ट दाबून ठेवलें. ओढाओढींत थर्मामिटर उडालें आणि जमिनीवर पडून फुटलें. मी चागलीच घाबरलें, आणि म्हटलें, " अय्या ! मधू ! आता काय करायचें ? " मधू स्वस्थपणें म्हणाला, " आई मारणार आपल्याला. " त्याला मार खायची संवयच आहे. तितक्यात आई तेथें आली. तिनें आमच्याकडे पाहिलें. आम्हीं आपलें खिडकीबाहेर पाहिलें. ती परत परत जास्तच पहायला लागली. आणि म्हणाली, " काय रे केलेंस मध्या. " मधू डोकें खाजवीत

म्हणाला, "काहीं नाहीं बुवा." तितक्यात आईनें फुटलेलें थर्मामिटर पाहिलें. मग काय... खूप शिव्या, दोन दोन धपके, चागले तीन चार गालगुच्चे आणि शिवाय मधूला एक मोठा चिमटा. मला खूप रडूं आलं. आम्हीं मुद्दाम केलें वाटतें तसें ! मग थोड्या वेळानें आईनें मला जवळ घेतलें. मी मिठी मारली. खाऊ मिळाला.

आम्हीं शाळेचीं पाकिटें घेतलीं. मीं मधूला म्हटलें, "तुझ्यामुळेंच सगळें झालें." आणि त्याच्या डोक्यात पाकीट मारलें. तशी त्यानें मला जोरानें रपाटा मारला. असला लागलाय् मला. आई ओरडली, आम्हीं धूम पळालों.

जिना उतरताना आम्हीं एकमेकाना खूप वेडावलें. खूप वेडावलें म्हणजे जीभ दुखतें. रस्त्यात आलें आणि एकदम आठवण झाली. बाईनीं तीन गणितें करायला सांगितला होतीं. अश्शी घाबरलें मीं. आमच्या गोष्टींतल्या त्या ससासारखी. पण पटकन् आठवण झाली. बाई शाळा सोडून जाणार होत्या मग कसला होतो अभ्यास ! अन् कसलें काय ! पटकन् उडी मारली आणि रस्त्यापलीकडे धावले. गाडी जाणार होती अंगावरून. पलीकडच्या दुकानातला मारवाडी माझ्यावर खेंकसला. चागलें वेडावून दाखवलें त्याला.

मीना रस्त्यातून चालली होती. शेपटा उडत होता अन् फूल हलत होते. काय पण बयाचें चालणें ! तिची आई फार फॅशन करते. गडी असतो बरोबर पुस्तकें घ्यायला. मला पाहून तो हंसला, आणि 'काय निमाताई' म्हणून त्यानें माझीं पुस्तकें घेतलीं.

मी मीनाच्या खांद्यावर हात ठेवला. काहींतरी खात होती लबाड. मी मोठ्यानें ओरडले, "काय ग खातेस ?"

तोंडातला चोथा थुंकीत ती म्हणाली, "चिंचा."

"अय्या, एकटीच खातेस ? मला दे ना."

"ही बघ एकच उरली आहे माझ्याजवळ."

"अन् काल दिली होती ती मी तुला ?"

तशी मीनानें वाकडें तोंड करून मला अर्धी दिली. अशी काय बाई ती मीना ?

एक म्हातारा दाढीवाला मुसलमान रस्त्यातून चालला होता. तो

हंसत हंसत माझ्या गालाला हात लावणार होता. " बेटी, बेटी " कायसें म्हणाला. आम्हीं दोघी खूप घाबरलों आणि मीनाच्या गड्याजवळ गेलों. मुसलमान म्हणे वाईट असतात. ते मुलींना पळवून नेतात आणि म्हणे कायसें वाईट करतात. पण आई म्हणते, लहान मुलानीं असलें बोलूं नये.

मग थोडया वेळानें मीना चोथा थुंकीत म्हणाली, " बाई जाणार आपल्या आज. "

काय झालें, कोण जाणें. घशाशीं मोठा गोळा आला माझ्या. आणि मी मीनाला म्हटलें, " मी ठेवून देतें माझी चिंच. बाईंना देईन. " आमच्या बाईंना चिंचा फार आवडतात.

मीना म्हणाली, " टाक खाऊन. "

पण मी चिंच पाकिटात ठेवून दिली. "

किती चागल्या आहेत आमच्या बाई. दिसतात पण किती छान. फुलवाल्याजवळच्या ताज्या वेणीसारख्या. कलाबतूसारखें हंसतात.

हें सगळें मी मीनाला सागणार होतें. पण असें काहीं बोललें म्हणजे ती हंसते. समजतच नाहीं तिला असलें बोलणें. मोठया डोळयाच्या विनूला मात्र समजतें. म्हणून तो मला आवडतो. बंडू गुंडू त्याला उगीच मारतात. पण तो रडत नाहीं.

मग मी मीनाला नुसतें एवढेंच म्हटलें, "छान आहेत नाहीं बाई आपल्या." मीना मान हलवीत म्हणाली, "छान. आणि आज अभ्यास देखील नाहीं."

मी काहींच बोललें नाहीं.

शाळेंत गेलों तेव्हां मुली लंगडी खेळत होत्या. त्यांनीं आम्हाला खेळाबला बोलवलें. मीना म्हणाली, " मी नाहीं ग बाई. आज मी रेशमी झगा घातला आहे. मळला अन् फाटला म्हणजे ? आई मारील मला. "

घाऱ्या डोळयाची अन् नकटया नाकाची चिमी म्हणाली, " आहे माहीत मोठी नट्टीच झालीस कीं नाहीं." ह्यावर आम्हीं खूप हंसलों. मीनाला रडायला आलें. मीना चागली पण आहे अन् वाईट पण आहे.

मग मुलींनीं मला बोलावलें. मीं म्हटलें, " आज आपल्या बाई जाणार. आज दंगा नाहीं करायचा. "

चिमी म्हणाली, "जाणार असतील बाई. पण म्हणून खेळायचें का नाहीं ?"

पण मुलींना माझेंच म्हणणें आवडलें. आम्हीं वर्गात गेलों. आमची खेळायची जागा दुसरी 'ब' च्या मुलींनीं घेतली. उद्या काढूं उट्टं. वर्गात गेल्यावर चिमी म्हणाली,

" मग आपण सागरगोटे खेळूं या. अगदीं गुपचूप." 'मी नकोच,' म्हणणार होतें. पण साऱ्या मुली पटकन् खेळायला बसल्या. मी खेळणार नव्हतें. पण चिमी अन् यमी, मीना आणि कमावर हुप्पी लावूं लागल्या, तशी मी कमाच्या जाग्यावर बसलें, आणि चिमीवर हुप्पी केली. मीना खुदकन् हंसली. मला सागरगोटे खेळायला आवडतात.

खेळताना मी चिमीला विचारलें, " बाई शाळा का ग सोडताहेत ! " चिमीला सगळें माहित असतें. कसें कळतें कोण जाणें !

चिमी म्हणाली, " अग त्याचें लग्न व्हायचें आहे."

मीं म्हटलें, " तुला कसें माहीत ! "

" अग काल मी बाबाच्या बरोबर चौपाटीला गेलें होतें ना तेंव्हा त्या एका माणसाबरोबर फिरत होत्या हातात हात घालून. बाबा म्हणाले, " असल्या कसल्या तुमच्या बाई. "

मीना खालीं मान घालून हंसली.

चकणी वाईट दिसणारी तारा मला जोरानें हलवून म्हणाली, " लगीन म्हणजे गम्मत असते नाय ग ! "

मीं म्हटलें, " हूं."

तशी ती आपली म्हणते कशी " मी पण आईला सांगेन माझें लगीन कर म्हणून. "

तशी आम्हीं सगळ्या खूप हंसलों. वेडी आहे तारा म्हणजे. पण चांगली पण आहे बिचारी. मुलींना फुलें देते.

चिमी म्हणाली, "तुला काळा डोम नवरा मिळेल." आम्हीं मग खूपच हंसलों. पण चिमीचें बोलणें मला आवडत नाहीं.

तारा मोठमोठ्यानें रडायला लागली. मीनानें तिला एक चित्र दिलें.

घंटा झाली आणि बाई आल्या. पण आम्हाला आपलें तें कळलेंच नाहीं. मग बाई म्हणाल्या, " मुलींनो. " तशी आम्हीं सगळ्या लाजलों. जाग्यावर जाऊन अगदीं गप्प बसलों. विनूची पट्टी पडून आवाज झाला. तशी आम्हीं

सगळ्यानीं त्याच्याकडे एकदम पाहिलें. तो लाजला आणि त्यानें सदऱ्यात तोंड लपवलें, गुंडू ओरडला, " बायको रे बायको, " सगळींजणं हंसलीं– मीसुद्धा. मग मात्र मी गुंडूवर डोळे वटारले. जवळ असता तर चिमटाच काढला असता.

आमच्या बाई हंसल्या. काहींतरी त्या बोलणार होत्या. पण मग आणखीनच मोठ्यानें हंसल्या. आणि मग त्याच्या तोंडावरचें हंसणें गेलें तरी त्या हंसतच राहिल्या. मग त्या एकदम खुर्चीवर बसल्या.

आमच्या बाई अगदीं लहान आहेत. आमच्या ताईहून लहान. म्हाताऱ्या चंपूताई म्हणतात कीं, त्यानीं आमच्या बाईना शिकवलें आहे म्हणून.. काहींतरीच.

आमच्या बाई खूप हंसतात, खूप गोष्टी सागतात. आम्हाला पण त्या गाणीं म्हणायला सागतात, आणि गोष्टी पण. मी आणि विनू गोष्टी फार चांगल्या सागतों. एकदा तर त्यानीं आम्हाला हलक्या आवाजात गाणें म्हणून दाखवलें. कित्ती गोड होतें म्हणून सागूं. अगदीं कलिंगडाच्या मधल्या गरासारखें. पण तितक्यात मोठ्या बाई वर्गावरून गेल्या—वाईट आहेत अगदीं–बाई लाजल्या. गाणें थाबलें.

आमच्या बाईना भूगोल आणि गणित मुळींच आवडत नाहीं. मला पण. शुद्धलेखनात चुका झाल्या तर फार रागावत नाहींत. आमचे विषय 'ब' वर्गाच्या पुष्कळ मागें रहातात. मग एखाद्या दिवशीं आमच्या बाई खूप रागावतात आणि सारखें शिकवत रहातात. मग आम्हाला काहीं समजेनासें होतें. गुंडू पुन्हा पुन्हा काहीं तरी प्रश्न विचारतो. बाई रागावून त्याच्यावर पट्टी उगारतात. पण मारत मात्र नाहींत. तो आपला हंसतो. मग बाई काहीतरी बडबडतात. आम्हीं रडायला लागतों. मग बाई पण डोळे पुसतात. मोठया बाई वर्गावरून जाताना म्हणतात, " वर्गात फार गलका होतो आहे. " मग जिकडे तिकडे गुपचुप.

पण हें एकच दिवस. दुसऱ्या दिवशीं बाई हंसत वर्गात येतात. इतक्या छान दिसतात त्या. आणि पातळांचे रंग तरी किती छान. मग चकणी तारा गुलाबाचीं फुलें बाईच्या डोक्यात घालते. ताराच्या वडिलाचें फुलांचें दुकान आहे.

मग बाई म्हणतात, " केस उसकटशील ना माझे. " आणि मग अगदीं हळू त्या तीं फुलें डोक्यात च.पून बसवतात. त्या तसें करूं लागल्या म्हणजे विनू त्याच्याकडे वेड्यासारखा पहात राहतो. विनू आमच्याहून मोठा आहे. आजारीपणामुळें तो मागें पडला. तो आपला अभ्यास अगदीं छान करतो.

बाई तशाच बसून राहिल्या, मग चकणी तारा उठली आणि हळूच म्हणाली, " बाई तुम्ही आज जाणार ना?"

बाई म्हणाल्या, " हो. " आणि मोठयानें हंसल्या. इतक्या मोठयानें त्या कधीं हंसत नाहींत.

" परत कधीं येणार ? " तारानें परत विचारलें.

" कधींच नाहीं. " बाई म्हणाल्या. आणि त्यानीं खालीं मान घातली.

मग मला एकदम हुंदका आला आणि मग सगळा वर्गच रडूं लागला.

बाई म्हणाल्या, " अग मुलींनो, वेड्या का तुम्ही ? ए विनायक जोशी, अरे तूं मुलगा ना ? मग रडतोस काय ? अशीं रडता काय वेड्यासारखीं ?"

पण मग बाईंच्याच डोळयातून पाणी आलें. आम्ही आणखीनच मोठ-मोठयानें रडूं लागलों. मग बाई उठून माझ्याजवळ आल्या आणि म्हणाल्या, " अग निमा, रडतेस काय अशी ?" आणि त्यानीं मला थोपटलें. अगदीं आईसारखें बाईचे हात मऊ आहेत. मग मीनाला पण त्यानीं समजावलें. तारा तर गळा काढूनच रडत होती. रडतानासुद्धा हंसूं आलें मला तिच्या आवाजाचें. बाईनीं तिला थोपटलें. तशी म्हणते कशी " बाई तुम्ही जाऊंच नका. "

मग बाई विनूजवळ गेल्या. विनू पाण्यानें भरलेल्या डोळयानीं त्याच्याकडे नुसता पहात राहिला. बाईनीं त्याच्या गालावर लहानशी चापट मारली; आणि त्या खुर्चीवर जाऊन बसल्या. मग त्या म्हणाल्या, " गप्प राहा पाहूं आता. "

तरी आम्ही रडतच होतों. मीना आपल्या रेशमी रुमालानें डोळे पुशीत होती. मी आपली हातानेंच पुसत होतें. चिमीनें डोळे पुसून अगदीं कोरडे केले. आणि ते परत पाण्यानें भरले नाहींत. बंडू आणि गुंडू खालीं माना घालून हंसत होते. मोठया बाईंच्या रुळानें अगदीं त्याना फोडून काढावें असें वाटलें मला. विनू पाणी भरल्या डोळयानीं खिडकींतून बाहेर पहात

होता. पाढरे ढग आकाशात धावत होते. मला वाटलें, आपण पण तसेंच धावावें.

मला परत हुंदका आला, इतक्यात मोठया बाई वर्गांत आल्या. आमच्या मोठया बाईंना मिशा आहेत. त्या हंसल्या म्हणजे अगदीं वाईट दिसतात. त्यांच्या बरोबरच्या बाई पाहून तर मी घाबरलेंच. दांत पुढें आलेल्या म्हाताऱ्या दुष्ट चौबळबाई होत्या त्या.

बदली होऊन त्या मागें दुसऱ्या शाळेंत गेल्या होत्या. कशाला आल्या परत कोण जाणे ! इतक्या वाईट आहेत त्या. आमच्या वर्गावर मागें एकदा आल्या होत्या. आम्हाला गणितें आलीं नाहींत, तशीं त्यांनीं आपलें आम्हाला वर्गांत कोंडूनच ठेवलें आणि म्हणतात कशा, "तुम्हाला कधीं सोडणारच नाहीं आता."

मग आम्हीं सगळीं ओक्साबोक्शीं रडायला लागलों. हो ऽ आम्हाला जेवायला कोण घालणार ! आणि रात्रीं अंधारात भीति नाहीं वाटतें वाटणार आम्हाला ? आई मला कुशींत घेऊन झोपवते. इथें कसें होईल ! आणि आई मला घेऊन सिनेमाला जाणार होती. मी झगा घालणार होते. मग त्याचें काय करायचें ! मला अगदीं खूप रडायला आलें.

मग घंटा झाली आणि मीनाचा गडी तिला न्यायला आला. तशी बाईंनीं दार उघडलें आणि आम्हीं घरीं गेलों. रडूं येत होतें सारखें. मीं आईला सगळें सांगितलें. दुसऱ्या दिवशीं मीं बाबांना शाळेंत नेलें होतें पण बाईच आल्या नव्हत्या. घाबरल्या वाटतें बाई बाबांना !

पण आम्हीं आता मोठया झालों. आम्हाला एवढें कळतें म्हटलें, कीं बाई अशा कोंडून ठेवायच्या नाहींत.

...मोठया बाई हंसत म्हणाल्या, "मुलानो, तुमच्या बाई आज शाळा सोडून जाणार आहेत. तुम्हीं वर्गांत खूप गलका करता, अभ्यास करीत नाहीं म्हणून त्या जाणार आहेत......"

......साफ खोटें, काहीं सुद्धा कळत नाहीं मोठया बाईंना.

......आता तुम्हाला ह्या नव्या बाई शिकवायला येतील. त्या तुम्हाला चांगलें शिकवतील. तुम्हीं त्यांचें ऐका आणि अभ्यास करा. मग मोठया

बाई हंसत हंसत आमच्या बाईंना कायसें म्हणाल्या, तशी आमच्या बाई उठल्या आणि म्हणाल्या, "तुम्ही चागला अभ्यास करा—खूप शिका—शहाण्या व्हा, आणि मोठेपणीं लोकाकडून चागलें म्हणून घ्या. नेहेमीं हंसावें. लोकाच्या उपयोगी पडावें, गोड बोलावें. म्हणजे लोक तुम्हाला चागलें म्हणतील.

बाईनीं सागितलेलें अगदीं सगळें ऐकायचें असें मीं ठरवलें. मधूशीं भाडायचें नाहीं. कोणाला चिमटे काढायचे नाहींत. आईला लिंबू कापून द्यायचें. बाबाना चष्मा आणून द्यायचा. दररोज उजळणी म्हणायची. छे सगळी कशी म्हणून होईल ? पाठ दुखते, मान दुखते, घसा कोरडा होतो पण अर्धी तरी म्हणायची आणि आजीनें पाठीवर पाय द्यायला सागितलें म्हणजे मुळींच पळून जायचें नाहीं. अभ्यास सुद्धा दररोज करायचा—अगदीं अर्धा तास.

मग आमच्या बाई जायला लागल्या, तशी आम्हाला मोठ्यानें रडायला आलें. बंडू—गुंडू देखील हंसायचे थाबले. चौबळ बाईनीं डोळे वटारले तशी आम्ही गप्प झालों. आमच्या बाईनीं जोरजोरानें रुमालानें तोंड पुसलें.

तशी चौबळ बाई त्याना म्हणाल्या, "एवढें का हें मनावर घ्यायचें असतें कमलाबाई ? आमच्या सहा सहा महिन्यानीं बदल्या होतात. म्हणून दर वेळेला का आम्ही वाईट वाटून घेतों ? आणि एवढें काय वाटायचें आहे ह्या पोराबद्दल." चिमीनें त्याना मागून वेडावलें—किती—आम्हाला खुदकन् हंसू आलें. अगदीं दारात बोटें चेंबटलीं पाहिजेत त्याचीं.

...आमच्या बाई काहींच बोलल्या नाहींत. बाहेर पडताना मागें वळून त्यानीं एकदा हळूच मान हलवली, आणि त्या गेल्या. अगदीं पुस्तकातल्या परीसारख्या एकदम दिसेनाशा झाल्या. माझ्या घशाशीं मोठा गोळा आला. डोळ्यातलें पाणी थाबेच ना.

चौबळबाई म्हणाल्या, "चला. उघडा गणिताचीं पुस्तकें." असा राग आला मला त्याचा...

पेन्सिल काढायला पाकिटात हात घातला. तशी आपली चिंच हाताला लागली. काय करावें तें कळेना. एकदम चिंच मुठींत घेतली आणि धूम ठोकली. चौबळबाई ओरडल्या, "अग—अग, चाललीस कुठें." पण मी

तशीच धावलें. जिन्यात बाई दिसल्या. मी मोठ्यानें ओरडलें "बाई, बाई!" मी पडणारच होतें. पण बाईनीं मला सावरलें. मग मी चिंच पुढें केली आणि म्हटलें, "ही घ्या बाई तुम्हाला चिंच, मुद्दाम ठेवली होती."

बाई माझ्याकडे पाहून हंसल्या. आणि म्हणाल्या, "वेडी ग वेडी." मी अगदीं खूप लाजलें. पण त्यानीं माझी चिंच घेतली. आणि मग एक मोठी गंमत झाली. बाईनीं आपला एकदम मुका घेतला माझा. मीं त्यांच्या-कडे पाहिलें. त्यानीं माझ्याकडे पाहिलें. आणि मग मी आपली वेड्या-सारखी पळत पळत वर्गात गेलें. आईनें अगदीं छान दागिना माझ्या गळ्यात घातल्यावर वाटतें ना, तसेंच मला वाटलें कीं सगळ्याना सागावें—पण नकोच गडे—फक्त विनूला—आणि आईला—पण.

चौधळबाई रागावल्या माझ्यावर. मला कांहींच वाटलें नाहीं त्याचें. त्याना कुठें माहीत होतें आमचें गुपित !

महिन्याचा शेवटचा दिवस होता. म्हणून आमची शाळा लवकर सुटली. आम्ही वर्गाबाहेर येताना धावलों नाहीं—हंसलों नाहीं. अगदीं सातवींतल्या मुलींसारख्या हळूहळू बाहेर आलों. बंड्या-गुंड्या मात्र धावले आणि विटीदांडू खेळायला गेले. मला पुष्कळदा दुपारीं उदास वाटतें. ते फेरीवाले—भिकारी, ऊन. आज फारच वाटत होतें.

विनू दिसला. मी मोठ्यानें ओरडले, "विनू."

तो थांबला आणि म्हणाला, "काय ग ?"

मी म्हटलें, "कुठें काय ? कांहीं नाहीं. आपलें उगीच."

मग आम्हीं दोघें हंसलों. एकदा वाटतें सागावें. एकदां वाटतें नको.

मग मीं म्हटलें, "तुला एक जमाडीजंमत सांगायची आहे, पण अगदीं गुपित हं. शप्पथ आहे—अगदीं दत्ताची." आमच्या शाळेजवळ दत्ताच देऊळ आहे.

विनू म्हणाला, "बरें शप्पथ."

मीं म्हटलें, "सागूं का ?" आणि मग दुसरीकडे पहात मीं म्हटलें, "बाईनीं आपला माझा मुकाच घेतला."

विनू आपल्या मोठ्या डोळ्यांनीं माझ्याकडे पहात म्हणाला, "खरेंऽ ?" आणि मग तो कांहींच बोलला नाहीं.

पण मला बरें वाटलें.

मग तो एकदम म्हणाला, "मला काय वाटतें सांगूं?" मीं म्हटलें "हुं."

"आपल्या गोष्टींतल्या त्या राजपुत्रासारखें घोड्यावर स्वार व्हावें आणि त्या दुष्ट राक्षसापासून बाईंना सोडवून आणावें."

काहींतरी एकएक बोलतो विनू; पण मला त्याचें बोलणें आवडतें. मग आम्हीं काहींच बोललों नाहीं. आपापल्या घरीं गेलों.

घरीं गेलें तर मधू आपला बिस्किटें खात होता. त्यानें मला "टुकटुक माकड" केलें. मी त्याला चिमटा काढणार होतें. पण आमच्या बाईंनीं काय सांगितलें होतें तें आठवलें म्हणून मीं त्याला नुसतेंच वेडावलें. वेडावायला काय हरकत आहे? वेडावलें तर चालतें.

त्या दिवशीं मीं आईचें पुष्कळ काम केलें. आईनें माझी पाठ थोपटली, आणि म्हणाली, "किती पण शहाणी आहे बाई माझी." मग मी तिला घट्ट मिठी मारली. सगळें सांगितलें. तिनें पण माझा मुका घेतला.

संध्याकाळीं उजळणी म्हणायला बसणार होतें. इतक्यात बाबा भलें मोठें कलिंगड घेऊन आले. मी त्यांना ताट आणून दिलें. त्यांनीं कलिंगड फोडलें. किती लाल लाल भडक होतें म्हणून सांगू. वाटलें कीं, उडी मारून मोठी फोड उचलावी. मध्या तर मटामट खाऊ लागला. मधू बाबाचा लाडका आहे. मी पण आहे म्हटलें लाडकी.

मग बाबांनीं चष्म्याच्या वरून माझ्याकडे पाहिलें आणि म्हणाले, "का निमाताई? आज मागें का तुम्ही? चल ये लवकर. नाहीं तर हा मध्या संपवील सगळें."

मी नुसतीच बसून राहिले. कलिंगड कसें लाल भडक दिसत होतें. तितक्यात आई बाहेर आली आणि म्हणाली, "आज तिच्या बाई शाळा सोडून गेल्या. म्हणून ती काहीं गोडधोड खाणार नाहीं आहे हो."

अशी वाईट आहे आमची आई. उगीच लोकांना माझ्याविषयीं काहींतरी सांगत असते.

बाबा 'हो–हो–हो,' करून हंसले. मध्या पण हंसला. दुष्ट कुठचा.

बाबा म्हणाले, "ये ग, ये ग. मला माहीत आहे. तुला एक फोड हवी

आहे." अगदीं मनातलें ओळखतात बाबा. वाईट आहेत अगदीं. मग ते एक फोड घेऊन उठले आणि माझ्यापुढें करीत म्हणाले, "घे ग, घे ग."

बाबाचा फार राग आला मला, पण मग मी ती घेतली. इतकें गोड होतें सागूं कलिंगड.

मध्या खालीं मान घालून हंसला. अस्सा राग आला मला. मी म्हटलें, "बाईनीं सांगितलें आहे मोठ्या माणसाचें ऐकावें. म्हणून घेतलें कलिंगड. मी काहीं तुझ्यासारखी हावरी नाहीं म्हटलें."

तशी सगळींच जणं मोठ्यानें हंसलीं. मधू तर फार मोठ्यानें. मी रागानें म्हटलें, "अशानें मी खाणार नाहीं हं."

मध्या हळूच म्हणाला, "बरेंच झालें." मला रडूं आलें. मग बाबा म्हणाले, "गप्प बस पाहूं मध्या" आणि मला म्हणाले, "बरें, बरें. त्याच्याकडे लक्ष नको देऊ तूं."

मग मी कलिंगडाच्या तीन फोडी खाल्या. अश्शी झोप आली. मग बाबाच्या पलंगावर जाऊन झोंपलें. उजळणीची आठवण झाली. कोणीं मेल्यानें ही उजळणी काढलीन् कोण जाणे. अस्सा कंटाळा आला होता सागूं. मग फक्त बेचा पाढा म्हणून झोपलें. उद्यापासून मात्र अगदीं नीट उजळणी म्हणायची हं.

रात्रीं मला स्वप्नें पडलीं. बाई कलाबतूसारखें हंसत होत्या. विनूचा घोडा जोरानें धावत होता—आईच्या कुशींत किती बरें वाटतें! आईनें मला कधीं कुशींत घेतलें!

—वाङ्मयशोभा, एप्रिल १९४५

## थकवा १३

अन्नपूर्णाबाई थकल्या होत्या. तसें पाहिलें तर आता त्यांची चाळिशी उलटली होती. आणि ह्या वयात सकाळीं दहा माणसांचा स्वयंपाक केल्यावर, परत दुपारीं लाडू आणि शंकरपाळे केले म्हणजे, नाहीं म्हटलें तरी मनुष्य दमतें.

वयोमानाप्रमाणें आता त्यांना काम झेपत नव्हतें. आवाक्याबाहेर काम पडलें म्हणजे श्वास आवरेनासा होई, कंबरेंत उसण भरे. आणि जीव वैतागून जाई.

आताहि तसेंच झालें होतें. आणि छोट्या अशोकनें जेव्हा रागत येऊन आजीच्या पायाला विळखा घातला, तेव्हा त्यांनीं त्याला बाजूला ढकललें, आणि पहिल्यानें मोठें फुलपात्र भरून गारसें पाणी प्यायल्या.

इतक्यात मुलें खेळून परतलीं. नळावर बादल्या वाजल्या. खिडक्यातलीं उन्हें कौलावर गेलेलीं त्यांनीं पाहिलीं आणि मग अन्नपूर्णाबाई चटकन् खिडकीजवळ आल्या.

ऑफिसातली मंडळी घरीं येऊं लागली होती. नाना बर्वे तावड्या भोपळ्याची एक फाक घेऊन येत होते. गरीब बापडे बन्याबापू, नेहमींप्रमाणें ऑफिसच्या कामाचे बरेचसे कागद हातात घेऊन खालच्या मानेनें परतत होते. घारुअण्णानीं नेहमींप्रमाणें छत्री नुसतीच मानेला अडकवली होती. आणि थोड्या वेळानें विश्वंभरपंत.........

अन्नपूर्णाबाईचा संसार काहीं आता नव्या नवलाईचा नव्हता. पण तेराव्या वर्षीं लग्न झाल्यापासून आज तीस वर्षें त्याचा हा क्रम चालू होता. वाडीच्या दरवाजाशीं विश्वंभरपंत दिसले कीं, त्या चटकन् घरात जात आणि

चहाचें आधण ठेवीत. पण विश्वंभरपंताच्या नजरेतून त्यांचें तें खिडकींत उभें रहाणें कधीं सुटत नसे. आणि एखाद्या दिवशीं त्या अशा दिसल्या नाहींत तर ते त्याच्या तब्येतीची चौकशी करूं लागत. आणि मग अन्न-पूर्णाबाईना मेल्याहून मेल्यासारखें होई घरच्या पुरुषानीं—नव्हे कोणीही आपल्या प्रकृतीविषयीं चौकशी केली म्हणजे त्याना अपराध्यासारखें वाटे...

खिडकींतून समोरच दिसणारा वटवृक्ष आपला विस्तृत शाखासंभार पेलून प्रौढपणें उभा होता. आणि त्याचीं पानें प्रसन्नपणें लवलवत होतीं.

अन्नपूर्णाबाईच्या संसाराला देखील अशीच प्रसन्नपूर्णता आली होती. त्याचे दोन मोठे मुलगे आता चागले कर्ते–सवरते आणि मिळवते झाले होते. सुना गुण्यागोविंदानें घरात नादत होत्या. जावई दिल्लीला साडेतीनशें रुपये पगारावर होता. शाळेतून घरीं आल्यावर भाडणारीं वसंत आणि नलू म्हणजे ह्या संसाराला खमंगशी फोडणी होती.

आणि छोटा अशोक आता आजीचा हात धरून स्वतःच्या पायावर उभा रहायला शिकत होता. त्याला गुरगुरीत दहीभात भरवताना बोटाना गुद-गुल्या झाल्या म्हणजे अन्नपूर्णाबाईना परम धन्यता वाटे. त्या कृतज्ञतेनें कात्रादेवीला नमस्कार करीत. मुलाबाळाची दृष्ट काढीत.

पण आज मात्र त्या कटाळल्या होत्या.

" म्हटलंऽ तादूळ किती घ्यायचे ? " धाकट्या सुनेनें हळूंच विचारलें.

" अग, घे लागतील तितके. रोज कसलें विचारायचें ? " अन्नपूर्णाबाई तोंड न फिरवता म्हणाल्या.

आणि मग आपल्या वागण्याचे त्याना आश्चर्य वाटलें, सूनबाईला तादूळ किती घ्यायचे तें माहीत नव्हतें थोडेंच ? पण ती गेली सासूबाईचा मान राखायला आणि आपण मात्र......

धाकटी सून नवऱ्याबरोबर संध्याकाळीं सिनेमाला जायची आहे असें त्यानीं ऐकलें होतें. आणि त्याना वाटलें सुनेला म्हणावें, " शेनिमाला जायची होतीस ना तूं ! जा आता मी करीन स्वयंपाक. "

पण त्यानीं तसें म्हटलें मात्र नाहीं. उलट त्याच्या कपाळाला उगीचच आठ्या पडल्या. सून बिचारी थोडा वेळ भोंवतीं घोटाळली आणि कामाला लागली.

आणि परत अन्नपूर्णाबाईंना चमत्कारिक वाटलें. त्याची धाकटी सून खरोखरच मोठी शहाणी आणि समजूतदार होती. संध्याकाळचा सारा स्वयंपाक ती करी आणि सासूबाईंना उतारवयात विश्रांती देई.

तशी लबाड देखील होती बरें ती ! एकदा खुद्द आपल्या सासऱ्याची नक्कल करताना अन्नपूर्णाबाईंनीं तिला पाहिलें होतें, आणि त्याना हंसं लोटलें होतें. पण हें सारें मोठ्या माणसाच्या दृष्टीआड–मर्यादेनें ! मोठ्या माणसाची अमर्यादा करायची नवी नीति ती शिकली नव्हती ....

दारावर भिकारी ओरडला, " भिक्षा वाढा माई."

मोठी सून खेंकसली, " चल हो चालता."

वसत कमरेवर हात ठेवून मोठ्या तोऱ्यानें त्याच्यामोर उभा राहिला.

अन्नपूर्णाबाईंना वाटलें, चटकन् पुढें व्हावं आणि मूठभर तांदूळ त्याच्या झोळींत टाकावे. काल त्यानीं असेंच नव्हतें का केलें ?

त्यावर धाकटी सून हळूंच म्हणाली होती, " रेशनिंग आहे ना हल्लीं ! "

आणि ह्यावर त्या म्हणाल्या होत्या, " बाई ग ! रेशनिंग असो, नाहीं तर फेशनिंग असो. दहा माणसाच्या नादत्या घरासमोरून याचक विन्मुख जायचा नाहीं. ईश्वरकृपेनें आपल्याला कांहीं कमी पडत नाहीं. आणि पडलें म्हणून गृहस्थधर्म का सोडायचा आहे ? "

पण आज मात्र भिकारी विन्मुख परतला.

...खिडकीबाहेरचा प्रकाश आता बराच पुसट झाला होता. आकाशातला जळता निखारा विझला होता आणि तिथें राखाडी शिल्लक राहिली होती.

अन्नपूर्णाबाईंना चुटपुट वाटूं लागली. " आज कां बरें इतका उशीर झाला ? " आणि त्या तशाच त्या वडाकडे पहात उभ्या राहिल्या. त्याना खिन्न वाटूं लागलें. सासरीं गेलेल्या मुलीसारखें मन कुठें तरी दूर गेलें... आणि तें वडाचें झाड समोर निश्चिलपणें उभें होतें.

त्या पोक्त वृक्षावरचें एक पान गळलें, वाऱ्याबरोबर भिरभिरलें, आणि हेलकावे खात, फरफटत, घरंगळत पाचोळ्यात जाऊन पडलें.

अन्नपूर्णाबाईंना वाटलें कीं, आयुष्याची कथादेखील अशीच आहे.

असेंच एकाकी भिरभिरायचें, हेलकावे खायचे आणि मग पाचोळयात जाऊन पडायचें. आणि कसल्याशा एकलेपणाच्या–अपूर्णतेच्या जाणिवेनें त्याचें मन कावरेंबावरें झालें.

. ...घरात कोणीतरी जोरात धपका मारला आणि मग अशोक कळवळून रडूं लागला.

अन्नपूर्णाबाईनीं मोठया सुनेला कितीतरी वेळा सांगितलें होतें कीं, "मुलाना मारायचें नाहीं. आणि तिन्हीसाजाच्या वेळेला नादत्या घरात मुलाना रडवायचें नाहीं." पण तिला काहीं हें कधीं पटलें नाहीं—पटायचे नाहीं.

त्याना वाटलें, अशोकला जाऊन उचलावें. माडीवर घालून निजवावें. पण त्या जाग्यावरून हलल्या नाहींत. तें रडणें ऐकत तशाच उभ्या राहिल्या व तो एकाकीपणा–अपुरेपणा अधिकच दाटला.

आणि मग त्याना एकदम एक चमत्कारिक इच्छा झाली कीं, दुधावरची थोडी साय खावी. नाहीं तरी मघाशीं दूध विरजताना त्यानीं थोडीशी काढून ठेवली होतीच.

इतर वेळेला त्यानीं अशी इच्छा दाबली असती, नव्हे स्वतःला चांगलेंच दटावलें असतें. पण आता मात्र त्या चटदिशीं घरात गेल्या. व पहातात तों नलू हळूंच ती साय खात होती.

मागचापुढचा विचार न करता त्यानीं नलूच्या पाठींत धपाटा मारला, आणि त्या ओरडल्या, "खादाड मेली."

नलू बिचारी मुसमुसत निघून गेली. आणि मग अन्नपूर्णाबाईनीं भसादिशीं एका मोठया भाडयात दूध ओतून घेतलें आणि पिऊन टाकलें. आपल्या कृतीचा काहीं अर्थबोध न होताच त्या बाहेर आल्या.

आणि उशाला एक लुगडयाचा बोळा घेऊन स्वस्थ झोपून राहिल्या...

आणि तरी परत त्याना एकाकी आणि अस्वस्थ वाटत होतें.

...ही एकलेपणाची–अपूर्णतेची जाणीव लहानपणापासून त्याची जिवलग जोडीदारीण होती. लहान वयात खेळाची दंगल संपल्यावर, हातपाय धुऊन तुळशीला नमस्कार करताना, दाटणारा काळोख ह्या मैत्रिणीला घेऊन येई आणि मग पाणाळलेल्या डोळयानीं छोटी अन्नपूर्णा आईच्या कुशींत शिरत असे.

तेराव्या वर्षी लग्न झालें. अन्नपूर्णा सासरी निघाली. वडिलांनीं उपरण्यानें नाक शिंकरलें. हुंदका आला म्हणून आई माजघरात गेली. म्हाताऱ्या आजीची मान अधिकच लटलटूं लागली. इषाऱ्यासरशीं बैलगाडी चालूं झाली. आणि मग ह्या जिवलग जोडीदारीणीच्या गळयात गळा घालून अन्नपूर्णेनें मनसोक्त अश्रुसिंचन केलें.

त्यानंतर पतिदेवाला आपलें सर्वस्व अर्पण केल्यावर देखील आपण शिल्लक राहिलों ह्या विचित्र अनुभूतीनें त्या दुःखित झाल्या होत्या.

तान्ह्या मुकुंदाचे रडणें स्वतःच्या दुग्धधारांनीं थांबवितांना, त्याचीं कितीहीं चुंबनें घेतलीं तरी तीं अपुरीं वाटतात, म्हणून त्या उदासीन झाल्या होत्या.

मुलाच्या मुंजीच्या वेळीं त्याला शेवटचें भरवताना ' तो मोठा, स्वतंत्र आणि निराळा होणार ' ह्या कल्पनेनें त्याचें सुख हरपलें होते.

शनिमहात्म्याची पोथी दर शनिवारीं नेमानें वाचीत असता, एखाद्या शनिवारीं त्याना वाटे कीं सारीं दुःखें एकाकीपणें भोगणाऱ्या विक्रम राजाच्या दुःखात आपणास सहभागी का होता येत नाहीं ? आणि त्या व्यथित होत.

तसेंच एखाद्या वेळेला खिडकींत उभें राहून रस्त्याकडे पहाताना त्याना वाटे कीं, रस्त्यातून फिरणाऱ्या ह्या शेंकडों लोकांचीं सुखदुःखें मला का कळत नाहींत ? आणि त्या हिरमुसल्या होत.

कधीं कधीं तर माजरीनें पायाला अंग घासलें अगर रात्रीं एखादें पाखरूं फडफडले तरी ही जाणीव त्याना बोंचत असे.

असें आपल्याला का वाटावें हें त्याना कळत नसे. सर्वसामान्य संसारी स्त्री ज्या सुखाची अपेक्षा करते तीं त्याना पुरेपूर मिळालीं होतीं. नव्हे चार बायकांनीं हेवा करावा असाच त्याचा संसार होता.

मग असें का बरे ? कीं त्याच्या हातून एखादें पाप झालें होतें. ?

पण तसें पाहिलें तर सर्वसामान्यपणे तरी स्त्रीधर्माचें त्यांनीं निष्ठेनें पालन केलें होतें. पतीची त्यांनीं अनन्यभावानें सेवा केली होती. विश्वभरपंताचें धोतर त्या स्वतः धूत आणि त्याच्या उष्टया ताटांत जेवत असत.

अलीकडे विश्वंभरपंतांना दातांची कवळी लागत असे. एक दिवस ते

कवळी काढीत असता अन्नपूर्णाबाईनीं पाहिलें. कवळीची लाळ पाहून त्याना किळस वाटली.

आणि मग स्वतःचीच लाज वाटून त्या दुसऱ्या दिवसापासून त्याची कवळी नेमानें धुवूं लागल्या.

एकदा त्यानीं ऐकलें कीं विश्वंभरपंत शनिवारीं शर्यतीवर पैसे उधळतात. ताबडतोब त्यानीं ह्याबाबतींत विश्वंभरपंताना विचारलें. पण ते 'हो' म्हणत ना, अगर नाहीं म्हणत ना. तेव्हा अन्नपूर्णाबाईनीं मुकाट्यानें उपोषण सुरू केलें. दोन दिवस पाण्यावर काढले. तिसऱ्या दिवशीं जागचें उठवेना. विश्वंभरपंतानीं विचारलें, "काय झालें?" पण त्या कांहींच बोलल्या नाहींत. पण धाकटा मुकुंदा म्हणाला, "आई परवापासून जेवीत नाहीं." तेव्हा विश्वंभरपंत स्वतः उठले आणि त्यानीं स्वयंपाक केला. बायकोला आणि मुलाला जेवूं घातलें. आणि शर्यतींचा नाद त्यानीं सोडला.

अन्नपूर्णाबाई घरात मुलाबाळाना उगाच हिडिसफिडिस करीत नसत. गडीमाणसें पाहुणेरावळे ह्याना त्या संतुष्ट ठेवीत. त्याच्या दारांतून याचक कधीं विन्मुख गेला नाहीं. आणि गृहस्थधर्माला अवश्य तीं धर्मकृत्यें त्या नेमानें आणि निष्ठेनें करीत. पण आपल्या धार्मिकतेचा बोभाटा व्हावा म्हणून पैसा नासून त्यानीं संसाराची ओढघस्त केली नाहीं.

शेजाऱ्यापाजाऱ्याकडे उगाच जाऊन बचाबचा बोलायचें आणि निंदा-नालस्ती करायची ह्या गोष्टींचा त्याना मनापासून कंटाळा असे. दुसऱ्याचें चागलें झालें म्हणून दुःख मानणाऱ्या माणसाचा त्याना सदैव तिटकारा वाटे. आणि आपल्याला अमुक नाहीं अगर तमुक नाहीं म्हणून त्या सहसा कधीं असंतुष्ट राहिल्या नाहींत.

लग्नामुंजींच्या समारंभात कुठेंही चार कामें करायला त्या चटकन् हौसेनें पुढें होत. आणि तिथें नुसता आपला मोठेपणा मिरवीत रहावें असें त्याना कधीं वाटलें नाहीं.

त्याच्या ह्या चागुलपणामुळेंच त्या अनेक बायकांना आवडत नसत. त्या कुटाळक्या करीत नसत म्हणून ह्या बायका त्याना गर्विष्ठ म्हणत आणि त्याच्या संसारांतलें सुख अनेकांच्या डोळ्यांत खुपत असे.

पण 'कोणाचें तोंड थोडेंच धरता येतें,' असा विचार करून त्या

ह्या टीकेविषयीं उदासीन असत. आणि आपल्या मनाला योग्य वाटेल तें करीत असत.

त्याचें आयुष्य म्हणजे बावनकशी सोनें होतें असा ह्याचा अर्थ नव्हे. चुका कोणाच्या हातून होत नाहींत ? आणि आपल्या आयुष्यातील कांहीं प्रसंग आठवले म्हणजे अन्नपूर्णाबाई देखील अस्वस्थ होत.

नुकतेंच लग्न झाल्यावर पोरवयांत त्यानीं सासूबाईचा डोळा चुकवून फळीवरच्या डब्यातले लाडू खाल्ले होते. पण त्याच्या सासूबाईच्या तें ध्यानात आलें आणि त्या त्याना फडाफडा बोलल्या. अन्नपूर्णाबाई तेव्हा संतापानें नुसत्या थरथर कापत होत्या. आणि अजून देखील त्याना वाटे कीं सासू-बाईनीं इतकें बोलायला नको होतें.

पण तेव्हा आपली देखील चूक झाली—पोरकटपणा झाला, असेंहि त्याना वाटत असे.

तसेंच एकदा विश्वंभरपंतानीं त्याना मनापासून हवी असलेली मोहनमाळ करून द्यायचें नाकारलें. तेव्हा आठ दिवस सतत त्यानीं घरात इतकी आदळ-आपट केली कीं, विश्वंभरपंतानीं शेवटीं कंटाळून त्याना ती मोहनमाळ आणून दिली. आणि त्यामुळें त्याना आपल्या कोकणातल्या काकाना शंभर रुपये मदत पाठवता आली नाहीं.

वामनभट म्हणजे उंच निंच थोराड मनुष्य. दिसायला देखणा. बोल-णारा मिठ्ठास. आणि बायकाच्या पुढेंपुढें करायची त्याला हौस. बायकाहि त्याच्याशीं मोकळेपणानें बोलत.

एक दिवस वामनभट एकादष्णी करायला आले असता अनवधानानें अन्नपूर्णाबाईचा त्याना धक्का लागला. तेव्हा त्याचें मन अस्वस्थ झालें. वामनभटाच्या तालीम करून कमावलेल्या दंडावर करकचून बसलेल्या गंड्याकडे त्याचें लक्ष वारंवार जाऊं लागलें. तशी त्या तेथून दूर निघून गेल्या पण रात्रीं स्वप्नात पापविचाराचा पडताळा आला. आणि घाम फुटून त्या जाग्या झाल्या......

दुसऱ्या दिवशीं त्यानीं कडक उपोषण केलें. आणि काद्याचे पदार्थ त्याना फार आवडत असत ते वर्ज्य केले. त्या दिवसापासून त्यानीं काद्याला स्पर्श केला नव्हता.

आणि असे कितीतरी प्रसंग सांगता येतील. पण जेव्हा जेव्हा त्यांचें मन विचलित झालें होतें अगर त्यांच्या हातून चुका झाल्या होत्या, तेव्हा तेव्हा त्यांनीं स्वतःला कधीं क्षमा केली नव्हती. उलट स्त्रीधर्माच्या ज्या कल्पना त्यांच्या मनात बिंबल्या होत्या, त्याना त्या अधिकच चिकटल्या होत्या. आपल्या कर्तव्यकर्मांत आपलें शरीर आणि मन अधिकाधिक वेचूं लागल्या होत्या आणि त्यामुळें त्यांचें मन चिंच लावून घासलेल्या भांड्या-सारखें अधिकच निर्मळ झालें होतें.

पण असें असून देखील ह्या एकाकीपणाच्या—अपूर्णतेच्या जाणिवेनें त्याना कधीं सोडलें नव्हतें. उलट ती त्याना अधिकच तीव्रतेनें भासूं लागे. आणि ती जाणीव नाहींशीं करण्याकरिता त्या अधिकच तत्परतेनें आणि ममतेनें आपलीं कामे करूं लागत.

पण अलिकडे त्याना वाटे, "पुरे आता" पुष्कळ झालें. हा सगळा ताण आता त्याना असह्य वाटूं लागला होता. हीं बधनें जाचक वाटूं लागलीं होतीं. एक प्रकारचा थकवा वाटूं लागला होता. वाटे कीं स्वस्थ बसून रहावें, काहीं करूं नये.

नाहीं म्हटले तरी आता वय झालें होतें. शरिराची कुरकूर वाढत होती. आणि मनही त्याचें साथीदार झालें होतें. उगाचच त्या संतापत, चिडत आणि स्वतःला दुःख करून घेत.

एकदा त्याना वाटलें होतें कीं संसारावर आपला फार जीव आहे. आणि म्हणून आपलें मन असें वैतागतें, कातावतें, खिन्न होतें. म्हणून एक दिवस त्यांनीं अशोकला घेण्याऐवजीं हातात माळ घेतली आणि जप करायला सुरवात केली. एकभुक्त व्हायचें ठरवलें. दागदागिने वर्ज्य करायचें ठरवलें.

पण अशोकनें रागत येऊन त्यांच्या हातातली माळ हिसकून घेतली. आणि रात्रीं जेवायचें नाहीं असें म्हटल्यावर मुलें जेवीत ना. एक मुलगा समोर बैठक मारून बसला आणि दुसरा बाहेर जाऊन म्हणाला, "नानाऽ आई...... "

अन्नपूर्णाबाई चटकन् उठल्या. त्यांनीं चार घास खाल्ले. आणि अशो-कला मांडीवर घेऊन निजवलें. आणि त्याच वेळीं त्यांच्या अंतरात्म्याची

खात्री पटली की वैराग्य ही आपली वृत्ति नव्हे, स्त्रीचा धर्म नव्हे. संसार हेंच तिचें जीवन आणि हाच तिचा मोक्ष. ह्यापरता तिला तरणोपाय नाहीं.

तर मग मनाच्या ह्या दुखण्यावर उपाय काय हें त्याना कळेना. आणि हट्टी दुखण्यावर औषध घ्यायचा असा कंटाळलेला रोगी थांबतो, तसेंच त्याच्या मनानें करायचें ठरवलें बस्स! काहीं करायचें नाहीं.

.. धाकट्या सुनेचीं पावले वाजलीं. अन्नपूर्णाबाईनीं तिला विचारलें, "किती वाजले ग?"

ती म्हणाली, "आठ."

अन्नपूर्णाबाई चटकन् उठून बसल्या. त्यानीं पदर सावरला. आणि काळजीनें त्या पुटपुटल्या, "अगबाई, अजून कसें येणें झालें नाहीं!"

सुनेनें त्याचें बोलणें ऐकलें नसावें. कारण ती काहींच बोलली नाहीं. त्याना वाटलें पुन्हा एकदा मोठ्यानें असें म्हणावें. नाहीं तर मोठ्या मुलाला विचारावें. पण त्याना तसें करायचा धीर झाला नाहीं. इतकें त्याचें मन भिडस्त होतें.

शिवाय अजून देखील त्याच्या मनावरची मलूलता गेली नव्हती. त्या उठल्या, आणि विश्वंभरपंताचें आणि आपलें अन्न निराळें काढून ठेवून परत बाहेर येऊन बसल्या.

घरात जेवणें चाललीं होतीं. वसंताची आणि मोठ्या सुनेची दही वाढण्यावरून कुरबूर चालली होती. आणि छोटा अशोक आजीनें भरवायला हवें म्हणून कुरकुरत होता.

पण अन्नपूर्णाबाईना आत जावें असें वाटलें नाहीं.

हळुंहळू जेवणें उरकलीं, झाकपाक झाली, निजानीज देखील झाली. पण विश्वंभरपंत काहीं आले नाहींत

दहाचे टोल वाजले. आणि मग मात्र अन्नपूर्णाबाई कावऱ्याबावऱ्या झाल्या. जिन्यावरचीं पावलें ऐकण्याकरिता त्याचे कान टवकारले. अधीरतेने त्यांची छाती धडधडूं लागली.

त्याना वाटलें, "मुलाला उठवावें..." आणि म्हणून त्या चट्दिशीं उठल्या देखील. पण निजानीज झाली होती. आणि घुटमळून त्या परतल्या. त्याना आपल्या सुनाचा आणि मुलाचा विलक्षण राग आला,

'घरचे मालक अजून परतले नाहींत आणि हीं मात्र डाराडूर झोंपलीं आहेत' आणि मग त्याना स्वत:चाच राग आला "मला तरी मेलीला मघाशींच मुलाला सांगायला काय झालें होतें? नुसती फनकल मारून बसलें होतें मी!"

चटकन् त्या खिडकीजवळ गेल्या आणि त्यानीं विश्वंभरपंताच्याच बँकेंत असलेल्या सान्याच्या खिडकीकडे पाहिलें. पण घरातला दिवा फक्त दिसत होता. साने आले कीं नाहीं तें काहींच कळत नव्हतें. त्याना वाटलें, चटकन् जिना उतरून जावें आणि चौकशी करून यावें. पण भीड परत नडली. आणि त्या जागच्या जागीं चुळबुळत राहिल्या.

आणि मग नाहीं नाहीं ते विचार त्याच्या मनांत येऊं लागले. दंगा तर सुरू नाहीं झाला? लागले असतील मेले 'जय हिंद' ओरडायला... चोराचिलटाचें भयदेखील कमी नाहीं रात्रीच्या वेळेला......आणि हे म्हणजे निष्काळजी .... आणि गाडीवाले आणि मोटारवाले तरी मेले कमी का द्वाड असतात ..वाटेल तशा गाड्या मोटारी हाकतात......

आता खरें म्हटलें म्हणजे कधीं कधीं महिन्याचा शेवटचा दिवस असला म्हणजे विश्वंभरपंताना बँकतून परतायला चागले साडेदहा सुद्धा वाजत असत आणि अन्नपूर्णाबाईंना ठाऊकहि होतें. पण ह्या विचाराला थारा द्यायला त्याचें मन बिलकुल तयार नव्हतें.

त्या भयभीत झाल्या. त्याच्या वृत्तीवरचें मालिन्य पार धुवून गेलें, आणि विझलेली शेगडी परत पेटवावी तसें काहींसें त्याच्या मनात झालें. त्याच्या पापभीरु मनाला वाटलें, आपण मघाशीं आडदाडपणानें वागलों, नेहेमींची रीत सोडली, मुलाबाळाचें केलें नाहीं, आपल्या वयाला न शोभेसा खादाडपणा केला म्हणून परमेश्वरानें ही आपल्याला प्रचीति दिली!

इतक्यात टेबलावरचें वर्तमानपत्र उडून त्याच्यासमोर आलें. आणि ठळक मथळा त्याना दिसला, "दिल्लींत गोळीबार" आणि मुलीची आणि जावयाची आठवण होऊन त्या अधिकच घाबरल्या. परत तेच विचार त्याच्या डोक्यातून फिरले.

आणि त्याचा जीव अगदीं उडून गेला. ती एकाकीपणाची—अपूर्णतेची जाणीव त्याना फार उत्कटतेनें झाली. आणि अभ्यास न करणारा मुलगा

जसा परीक्षा जवळ आल्यावर एकदम कावराबावरा होतो, सगळाच्या सगळा अभ्यास आताच करून टाकावा असें जसें त्याला वाटतें, तशीच अन्नपूर्णाबाईची अवस्था झाली.

मन आवरावें म्हणून त्यानीं रामाच्या कथेचें पुस्तक घेतलें, आणि कुठचेंसें पान त्या वाचूं लागल्या.

...रजक निंदेमुळें रामानें सीतामाईचा त्याग केला होता. डोहाळे पुरवायला नेण्याच्या निमित्तानें लक्ष्मण तिला वनात घेऊन चालला होता. सीतामाईनें लक्ष्मणाला अनेक प्रश्न विचारले. पण तिला उत्तर मिळेना. तिचें मन आतुर झालें, तिचा डोळा लवूं लागला. त्या अशुभ चिन्हामुळें ती भोळीभाबडी पतिव्रता घाबरून गेली. पण तिच्या मनात स्वसुखाचा विचार डोकावला देखील नाहीं. उलट त्या माउलीनें दोन्ही हात जोडून परमेश्वराची अशी प्रार्थना केली कीं, "माझ्या पतीला सुरक्षित आणि सुखात ठेव." ते शब्द वाचून अन्नपूर्णाबाईचा कंठ दाटून आला, मन सद्गदित झालें.

ही सीतामाई मनाच्या ज्या पवित्र प्रीतिनिर्भर अवस्थेला जाऊन पोंहोचली होती तेथेंच त्यानाहि जायचें होतें. हीच ती अपूर्णतेची जाणीव होती. हाच तो एकाकीपणा होता. आणि शरीर किती थकलें, मन कितीहि कातावलें, तरी हा मार्ग सोडून देणें किती वेडेपणाचें होतें !

अशोक बाळ रडला तर त्याला गप्प करायचें नाहीं, त्याला भरवायचें नाहीं, आणि छोट्या नलूला मारायचें ! छे, छे, ह्या गोष्टी त्याना त्याच्या मार्गावरून पुढें नेणार नव्हत्या. ह्या गोष्टी लहान असतील कदाचित् पण शबरीचीं उष्टीं बोरें अशी कितीशीं मोठीं होतीं ?

नाहीं. शरीर थकलें, मन कातावलें तरी त्याना ह्याच रस्त्यानें पुढें जायचें होतें. अगदीं दूरवर—अपूर्णतेच्या पलीकडे !

त्याच्या डोळ्याच्या कडा ओलावल्या.

"हें काय ? काय झालें ? मला उशीर झाला. म्हणून कीं काय ?"

अन्नपूर्णाबाईनीं वर पाहिलें. विश्वंभरपंत समोर उभे होते.

त्या ओशाळल्या आणि चटकन् उठून घरात जात म्हणाल्या, "पान तयार करतें."

—वाङ्मय-शोभा, दीपावली १९४९

# मनोवेधक ललित वाङ्मयासाठीं—



**मानसचित्रें** या संग्रहातील बऱ्याच कथा **वाङ्मयशोभा** मासिकात प्रसिद्ध झालेल्या आहेत. वाङ्मयगुणाची निश्चित पारख करून तशा वाङ्मयाला सतत प्रसिद्धि देण्याचें काम वाङ्मयशोभेनें गेली सात वर्षें केलेलें आहे.

श्री. **गाडगिळांच्या** प्रमाणेच **श्रीधर देशपांडे, त्र्यं. वि. सरदेशमुख, वि. म. कुलकर्णी, शांता शळके, रझ्झाक मुल्ला,** इ. आजच्या अनेक लोकप्रिय लेखकाचें लिखाण वाङ्मयशोभेत प्रसिद्ध झालेलें असून या लेखकापैकीं काहींचीं **ठगणें अस्मान, ससेमिरा, विसर्जन** इ. पुस्तकेंहि प्रसिद्ध केलीं आहेत. सविस्तर माहितीपत्रक मागवा.

